# आमोक

उर्फ

# वेडापिसा




अनुवादक.

प्रो. डॉ. न. का. घारपुरे

ए. पी. एच्. डी.

एल्-एल्. बी. एस्. टी. सी. पुणें.



प्रकाशक.

तरुण-साहित्य-माला

नवापुरा, सं. धार.

१९३६

किंमत. १ रु.



माझे परम-पूज्य वडील

कै. तीर्थरूप

काशीनाथ नारायण घारपुरे

यांच्या

पवित्र चरणीं

कृतज्ञतापूर्वक

अर्पण.

न. का. घारपुरे.

# मालेचे पेट्रनस्.



श्रीमंत महाराज सदाशिवराव खासेसाहेब पवार,
देवास राज्य २.

श्रीमंत राव बहादुर सेतुरामबाबा पवार, धार.

श्रीमंत आनंदराव जाधव राजेसाहेब, देऊळगांव.

दिवाण बहादुर के. नाडकर, दिवाण आणि अॅड-
मिनिस्ट्रेटिव्ह कौंसिलचे अध्यक्ष, सं. धार.

श्री. रा. रा. आर्. जी. नाडकर, बी. ए. एल्-एल्. बी.
धार.

श्री. प्रो. बा. ग. चव्हाण, एम्. ए. धार.

श्री. चिंतामण बळवंत लेले, बी. ए. धार.

## हितचिंतक.

श्रीमंत महाराजकुमारी अलकनंदाबाई जाधव, देवास २



वाङ्‌मयक्षेत्रांत सशाच्या गतीनें भरधांव चालण्याची हाव असतानांसुद्धां केवळ सहकार्याच्या अभावीं व लोकांत वाङ्‌मयाभिरुचि तितकीशीच असल्यामुळें कासवाची गती अंगिकारल्याशिवाय इतर मार्ग राहूं नये यासारखी खेदाची दुसरी कोणती गोष्ट असावी? याचें माझ्यामतें एकच कारण असूं शकतें. मध्यहिंदुस्तानांतील बहुसंख्य परभाषीय असल्यामुळें व एकंदर व्यवहार त्यांच्याच भाषेंत होत असल्यामुळें मातृभाषेविषयीं असणारा जिव्हाळा कमी होणें साहजिकच आहे. परंतु भासत असणारी निराशा-जनक स्थिती हळुहळु निवळत जात आहे, हें खास! ठिकठिकाणीं महाराष्ट्र समाज, मराठी साहित्य संस्था, मंडळें अलिकडे स्थापन झालीं व होत आहेत. तेव्हां भविष्यकाळ उज्वल आहे अशी खात्री वाटू लागली आहे. गेल्या डिसेंबरांत इंदूर येथें भरलेलें २०वें मराठी साहित्य संमेलन

वरील बदलास पुष्टीच देईल. पण इतर प्रांतांच्या मानानें एकंदर लेखकवर्ग कमीच! साहित्याची आवड सुस्थितीच्या काळांत होत असली तरी तिला राजाश्रयाचा पाठिंबा असणें, अत्यंत अवश्य आहे. विद्यमान् मराठी वाङ्मय कोणत्या दिशेनें जात आहे यावर वाद माजविण्यांत हंशील नाहीं. वाङ्मयनिर्मिती होणें हें समाजाच्या उत्कर्षाकरितां प्रमुख साधन आहे. प्रस्तुतची लघुकादंबरी विचारप्रवर्तक असल्यामुळें वाचकांना उद्‌बोधक व चित्ताकर्षक होईल, असा पूर्ण भरवसा आहे. मध्याहिंदुस्तानांतील महाराष्ट्रीयांस आग्रहाची विनंती आहे कीं, त्यांनीं मालेचे सभासद वा ग्राहक होऊन मातृभाषेवरील ओसरणारे प्रेम पुन्हा जागृत करावें. स्वतःचें वैशिष्ट्य न सोडतां दुसऱ्याकडून उपयुक्त गोष्टी ग्रहण करून बुद्धीला उज्वलता आणण्यांत महाराष्ट्रीयांचा हातखंडा आहे. या प्रकाशनप्रसंगीं मालेचे कांहीं सभासद झाले आहेत, ही अभिमानाची नोंद आहे. मध्य हिंदुस्थानांतील प्रकाशन संस्था म्हणून तिला हळुहळु मध्यवर्ती स्वरूप येवूं लागलें आहे. मालेला पुस्तक दिल्याबद्दल श्री. डॉ. घारपुरे यांचें आभार मानणें संपादकाच्या आटोक्यांतलें काम नाहीं.

वाङ्मयक्षेत्रांत त्यांचा उत्तरोत्तर उत्कर्ष होवो, हीच परमेश्वराजवळ मागणी आहे. सहकारी मुद्रणालयाचें छपाईचें काम समाधानकारक व विशेष काळजीपूर्वक झाल्यामुळेंच पुस्तकाला आज हें रूप दिसत आहे. मी अंगिकारलेल्या कार्याबद्दल छापखान्याच्या चालकांची पूर्ण सहानुभूति आहे, हें नमूद करण्यास मला फार आनंद होत आहे.

चिंतामण बळवंत लेले, बी. ए.

—संपादक

---



प्रो. श्री. नि. चापेकर

# आहेरावरील आच्छादन—

सुविद्य व परदेशांतून जाऊन आलेले पुष्कळ सुशिक्षित लोक आपल्यांतील रूढ धार्मिक आचार पूर्ववत् पाळीत असलेले दिसतात. असें करण्यांत तात्विक श्रद्धेपेक्षां मनाची सुसंस्कृतता व आपल्या रूढ आचाराविचारांविषयींचा स्वाभिमानयुक्त आदर व आपलेपणाची भावना या दोन गोष्टींचें आधिक्य विशेष दिसून येतें. त्याप्रमाणें आमचे मित्र प्रो. डॉ. घारपुरे यांनीं मला त्यांच्या प्रस्तुत पुस्तकास प्रस्तावनारूप चार शब्द लिहिण्याची कामगिरी सांगितली. त्यांतही माझ्यामतें प्रस्तावनेच्या रूढ प्रघाताबद्दलचा औपचारिक आदर व माझ्या स्वतःबद्दल त्यांना वाटणारा मित्रत्वाचा आपलेपणा, या दोन भावनांच्याच प्रेरणेचा अंश प्रमुखपणानें दृग्गोचर होतो; म्हणून मीही आपली कामगिरी मोठ्या आनंदानें खालीं थोडक्यांत बजावतों.

'आमोक' ही छोट्या कादंबरीवजा असलेली गोष्ट साप्ताहिक सकाळांत क्रमशः प्रसिद्ध होत असतांनां कित्येकांच्या नजरेखालून गेली असेल; तथापि अशा नियमित वाचकांची संख्या प्रायः

थोडीच असते. एखादी गोष्ट अथवा कादंबरी क्रमशः प्रसिद्ध होत असतां, ती नियमानें वाचणारे असे वाचक प्रायः थोडे असतात; पण ती पुस्तकरूपानें प्रसिद्ध झाल्यावर वाचकांची संख्या पुष्कळ पटींनीं वाढण्याचा संभव असतो. या सर्वांपेक्षांही लेखकाच्या मनास विशेष समाधान आणि भावी कालाविषयीं विश्वास उत्पन्न करणारी गोष्ट म्हटली म्हणजे वर्तमान् पत्राच्या अंकांच्या फाईलींतील साधारणतः सांदीकोंदीच्या अज्ञातवासां-तील व 'दबलेल्या' जीवनापेक्षां पुस्तकरूपानें लेखकाच्या कृतीची आयुर्मर्यादा जास्त वाढून बरींच वर्षेंपर्यंत खाजगी किंवा सार्वजनिक पुस्तकालयाच्या कपाटरूपी सुरक्षित गृहांत नांदल्यानें, शिवाय वारंवार अनेक रसिक जनांच्या घरीं जाण्याचे, निदान त्यांचे ओझरते कृपाकटाक्ष स्वतःवरून फिरले जाण्याचे-सुयोग त्यास दीर्घकाल लाभत रहातात. असो. प्रस्तुत गोष्ट मूळ जर्मन भाषेंतील असून, तिचा कर्ता स्टीफॅन स्वाइग हा सध्याच्या काळीं जर्मन कथा वाङ्मयांत किंबहुना, एकंदर युरोपांतील "लघुकथा" विषयक वाङ्मयक्षेत्रांत ज्यांच्या कृती सर्वतोमुखीं विशेष वाचनीय व लोकप्रिय आहेत अशा कांहीं हाताच्या बोटावर मोजतां येणाऱ्या लघुकथा लेखकांपैकीं प्रमुख गणला जातो, ही गोष्ट पुष्कळास ऐकून ठाऊक असेलच. प्रो. डॉ. घारपुरे यांच्या 'अमोक' च्या अनुवादासंबंधी एक दोन गोष्टी विशेष ध्यानांत ठेवण्यासारख्या आहेत. त्यापैकीं

एक मुख्य म्हटली म्हणजे प्रो. डॉ. घारपुरे यांचा अनुवाद इंग्रजी वगैरेमध्यें केलेल्या भाषांतराच्या दुय्यम व 'दुभाषी' वजा साधनावर अवलंबून राहून केलेला नसून गोष्टीच्या मूळ जर्मन पेहेरावावरूनच केलेला आहे; त्यामुळें भाषेच्या व भावनाविष्काराच्या बाबतींत मुळांतील जें स्वारस्य व ज्या खाचाखोंचा असतील-त्यांचेच यथार्थ व यथाशक्य-प्रतिबिंब अनुवादांत असल्याबद्दल वाचकांना अधिकारयुक्त ग्वाही आपोआप मिळाल्यासारखी आहे.

दुसरा मुद्दा म्हणजे, मुळांत जी काय स्थलें, व्यक्ति वगैरेंच्नीं नांवें आली आहेत, तीच कायम ठेऊन प्रो. डॉ. घारपुरे यांनीं अनुवाद केला आहे. त्यामुळें 'अनुवादास' 'रूपांतराचा' वेष देण्याच्या प्रयत्नांत जे अनेक हास्यास्पद वैचित्र्याचें किंवा मुळांतील स्वारस्याची हानी व लोप करणाऱ्या विसंगतीचे प्रकार पुष्कळ रूपांतरांत आढळून येतात ते येथें अनायासें टळले आहेत. हल्लीं निरनिराळ्या भाषेंतील वाङ्मयाचें तुलनात्मक अध्ययन व ज्ञान करून घेण्याची उत्सुकता साधारण जिज्ञासू वाचक वर्गांत उत्पन्न झाली आहे. अशावेळीं धेडगुजरी व विपर्यस्त रूपांतरापेक्षां परभाषांतील वाङ्मयकृतींचे मुळांतील स्थळ, काळ, व्यक्ति व नांवें वगैरे कायम ठेवून तसेच्या तसेच अनुवाद करणें हें अधिक इष्ट व उपकारक

ठरत आहे. त्यायोगानें निरनिराळ्या भाषांतील विचार प्रदर्शनाच्या धाटणी व छटा, वैशिष्ट्यपूर्ण मार्मिक म्हणी व खुबीदार शब्दप्रयोग ( Idioms ) इत्यादिकांचें ज्ञान होऊन, शिवाय त्या त्या वाङ्मयाच्या स्वरुपावरून तें लिहिणाऱ्या समाजांतील लोकांच्या विशिष्ट मनोवृत्ति व जनस्वभाव, सामाजिक ध्येयें, रूढ समजुती, त्या समाजाची सद्यःस्थिती यांचीही यथातथ्य कल्पना व अटकळ घरबसल्या सहज होऊं शकते.

अनुवाद, भाषांतर किंवा रूपांतर–या प्रकारांना वेळीं-अवेळीं नांवें ठेवणें, नाक मुरडणें किंवा गौण व दुय्यम लेखणें, त्यांचा अवमानपूर्वक उल्लेख करणें, ही जणुंकाय एक ठरीव रूढि ‘ फॅशन’च पडून गेली आहे. यासंबंधीं मौज दिसून येते ती ही कीं त्यांच्या ठिकाणीं ‘ स्वतंत्र ’ तर राहोच पण ‘अनुवाद’, ‘रूपांतर’ वगैरे करण्याच्या दृष्टीनें फारशी पात्रता दिसून येत नाहीं असेंच लोक दुसऱ्याबद्दल हा आक्षेप काढून, दुसऱ्याला कमीपणा आणल्याचें–त्याला ‘ जिरवल्याचे ’–तामसी व आत्मवंचक समाधान स्वतःला प्राप्त करून घेण्याविषयीं विशेष आतुर असतात. ‘ द्राक्षें आंबट ’ वाटण्यांतलाच हा प्रकार म्हणावयाचा ! लेखकांचा दुसराही एक मोठा विचित्र व मजेदार वर्ग आहे. त्यांतील लोक नेहमीं स्वतःच्या ‘ स्वतंत्र ’ प्रतिभेच्या व ‘ मौलिक ’ (!) बुद्धीच्या वेळीं-अवेळीं फुशारक्या मारीत असतात व वर सांगितलेल्या लोकांप्रमाणेंच भाषांतर,

अनुवाद वगैरेविषयीं तिरस्कार व तुच्छता दर्शविण्याचा सदा आव आणीत असतात. पण त्याच्याच बरोबर हे लोक क्षुद्र, असूयापूर्ण, अत्यंत परोत्कर्षासहिष्णु व अनुकरणलोलुप असे असतात. वाङ्मयशाखांतील कोणतीही शाखा आपल्या तावडींतून सुटलेली नाहीं व कोणत्याही वाङ्मयलेखन प्रकारांत आपली गति नाहीं असें नाहीं, हें लोकांच्या निदर्शनास आणण्याविषयीं त्यांची सदा धडपड व दुर्दम्य अट्टाहास चालूं असतो. त्यास अनुसरून व स्वार्थाच्या दृष्टीनें, 'भाषांतर' 'अनुवाद' वगैरेची यांना लहर—हुक्की आली कीं लागलीच 'पगडी'—किंवा 'हॅट' फिरवून ते भाषांतराच्या व अनुवादाच्या आवश्यकतेचे पोवाडे व गोडवे गाऊं लागतात. बेडूक सावेश आक्रोश करूं लागले कीं पाठोपाठ चिखली पाऊसाची वृष्टि ठेवलेलीच, हें अनुमान जसें व्यवहारांत अनुभवसिद्ध खरें आहे, तसेंच, अशा वर्गापैकीं एखादी प्रथितयश विभूति, भाषांतर, अनुवादादिकांची तळी उचलून, 'उदो ! उदो !' चा आवेश-उद्घोष करूं लागली कीं, ऐकणारानें आपल्या मनाशीं पक्की खूणगांठ घालून ठेवावी कीं, हे राजश्री कांहींतरी भाषांतरित कृति लवकरच 'निपजविण्याच्या' उद्योगांत अथवा तयारींत आहेत ! या सर्व विवेचनाचा मुख्य उद्देश एक महत्वाची गोष्ट वाचकांपुढें विशेष अगत्यानें मांडण्याचा आहे ! ती गोष्ट ही कीं ज्याप्रमाणें ईश्वरदत्त स्वतंत्र प्रतिभा-शक्तीचा उपयोग करून वाङ्मयकृति निर्माण करणें हें भूषणास्पद आहे,

त्याचप्रमाणें परभाषेंतील एखादी सुंदर वाङ्मयकृति भाषांतर अथवा अनुवादरूपानें स्वभाषेंत आणणें कमीपणाचें तर नाहींच पण त्याच्या कर्त्यास जवळ जवळ स्वतंत्र कृतीच्या निर्मिती इतकेंच गौरवार्ह असून, स्वभाषाभिवृद्धीच्या व सर्वांगीण वाङ्मयविकासाच्या दृष्टीनेंही, ते श्रेयस्कर व उपकारक आहे.

हल्लींच्या रूढ परिभाषेप्रमाणें, ज्यांना कांहीं विशेष निवेदन अथवा कथानक आहे अशा लहानसर व्याप्तीच्या रचनाप्रकारांत दोन प्रमुख भेद आहेत. यापैकीं पहिला प्रकार म्हणजे सर्व-परिचित व हल्लीं विशेष प्रिय असा ‘ लघुकथां ’ चा ( Short story ); व दुसऱ्या प्रकारास ‘ कादम्बरिका ’ ( Short novel) असें नांव देण्यांत येतें. ‘ विधानां ’ च्या ( Technique ) दृष्टीनें ‘ लघुकथा ’ व ‘ कादम्बरिका ’ यांत बराच फरक असला तरी सामान्य वाचक ( ‘ मुलें वाफेलाच धूर म्हणतात ’ या मराठी चौथ्या क्रमिक पुस्तकांतील अर्थपूर्ण वाक्याप्रमाणें ) सर्वच लहानसर निवेदनांना ‘ लघुकथा ’ च समजतात. परंतु सामान्य वाचकांचीच गोष्ट कशाला ? अशा तऱ्हेचा जर्मन वाङ्मयांतील अल्पविस्तारी निवेदनात्मक कथांचा संग्रह ज्यांनीं संपादित केला आहे व ज्यांत प्रस्तुत ‘ आमोक ’ याचाही समावेश केला आहे त्यांनींही या दोन रचनाप्रकारांतील तारतम्य स्पष्ट करून

दाखविण्याच्या भरीस न पडतां, त्या संग्रहास जर्मन कादम्बरिका ( Short Novels ) असें नांव दिलें आहे.

तथापि आपल्याकडे ‘ लघुकथा ’दि रचनाप्रकारांच्या तत्वांचा व ‘विधानां’चा ( Technique ) अभ्यास नवीनच घातला असल्यामुळें, कथानकप्रधान निवेदनाचे जे निरनिराळे प्रकार आहेत, त्यांच्या वैशिष्ट्यासंबंधींच्या कल्पना स्पष्ट व निश्चित स्वरूपाच्या असणें इष्ट आहे, म्हणून त्याचें येथें किंचित् दिग्दर्शन केल्यास अस्थानीं होणार नाहीं असें वाटतें. प्रथम आपल्याकडील संस्कृतकथावाङ्मयाच्या स्वरुपाचा स्थूलमानानें विचार केल्यास तद्दर्शक असे ‘कथा’, ‘आख्यान’, ‘उपाख्यान’ हे शब्द मुख्यतः मनांत उभे रहातात. लहान असो, विस्तारयुक्त असो, पण जेथें कांहीं कथानक निवेदन आहे त्याला सर्वसामान्यतः ‘कथा’ हेंच नांव योजण्यांत येतें. तथापि, त्यांपैकीं कांहीं संबंधीं, प्रत्यक्ष नसलें तरी, गर्भित रीतीनें अल्पविस्ताराची कल्पना ध्वनित असते. उदाहरणार्थ; पंचतंत्र, हितोपदेश, वेताळपंचविशी इ.तील कथांत किंवा श्रीमद्भागवत, श्रीमद्महाभारतादि ग्रंथांत प्रसंगोपात्त निवेदन केलेल्या कांहीं कथांत अल्पविस्तारित्व हेंच वैशिष्ट्य असणें, पण याच्या उलट बाणाची ‘कादंबरी,’ किंवा ‘कथासरित्सागर’ अथवा ‘ श्रीमद्भागवत, ’ ‘ श्रीमद्महाभारत ’ यांच्यातीलच

कथा विषयाच्या महत्वानुरूप बऱ्याच विस्ताराच्याही आढळून येतात. सारांश आपल्याइकडील जुन्या साहित्यशास्त्रांत, कला-विधानाच्या दृष्टीनें निवेदनाचा लहान मोठा विस्तार हेंच मुख्य प्रमाण नसून, निवेदन विषय किंवा निवेदन विषयीभूत व्यक्तींचें चरित्र यांचें कमीअधिक महत्व व माहात्म्य हेंच विशेष निर्णायक तत्व असतें. म्हणून महाभारतांतील अनेकविध इतर कथांपेक्षा नलराजाची कथा, प्रभु रामचंद्राचें चरित्र, सावित्रीचें आख्यान, हरिश्चंद्र, ययाति इत्यादि आख्यानांची विशेष महती मानण्यांत येते. 'कथा,' 'आख्यान', 'उपाख्यान' यांच्याहीपेक्षां नेहमींचा परिचित शब्द म्हणजे ' गोष्ट ' हा होय. पण यांत देखील निवेदनाची आकर्षकता हाच गुण प्रामुख्यानें सूचित असून, विस्ताराचें कमीअधिक प्रमाण त्या त्या शब्दांच्याद्वारें तादृश—किंबहुना मुळींच सूचित होत नाहीं. पण प्रसंगविशेषीं, कथाश्रवणप्रिय बालकें किंवा तत्सदृश वृत्तीचे सामान्य जन यांच्या दृष्टीनें विचार केल्यास, ' गोष्टी 'ची दीर्घता-प्रदीर्घता देखील-हीच विशेष इष्ट व ध्वनित असते.

आतां पाश्चात्य वाङ्मयांतील कथादर्शक शब्दांची थोडक्यांत पहाणी करूं. ' Story ' ' Tale ' ' Narrative ' हे शब्द सामान्यतः 'निवेदनाला'च अनुलक्षून असून त्यांचा सर्वसाधारण मनोरंजकता हाच एक गुण सूचित व गृहीतच धरल्यासारखा

असतो. गोष्टीच्या विस्ताराच्या कमी अधिक प्रमाणाचा गुण केवळ अस्फुट व मोघम किंवा गौण व दुय्यम दर्जाचा असतो; व विस्ताराच्या कमीअधिकपणाचें औचित्यअनौचित्य गोष्टींतील मनोरंजकतेच्या उत्कटपणाच्या कमीअधिक प्रमाणावरून निश्चित होते. पण कथा व गोष्टी यांच्या मनोरंजकतेचा सर्व सामान्य मुद्दा बाजूला पडून, जेव्हां थोड्याशा निवेदनानें चटका लावून सोडणें याच हातोटीला व तिच्यांतील उत्कर्षपूर्ण कौशल्याला प्राधान्य दिलें जातें, तेव्हां अल्पविस्तारित्वाला—गोष्टीच्या आटोपशीर व लहानसरपणाला—वाङ्मयसौंदर्याच्या दृष्टीनें कलांगाचें स्वरूप प्राप्त होतें; व याच कलांगाचा विकास पूर्णत्वास नेणें, हेंच हल्लींच्या ललित वाङ्मयाचें ध्येय आहे; त्याचेंच निदर्शक म्हणजे "लघुकथा" हा लेखन प्रकार होय. आटोपशीरपणा व लहानसरपणा हे एकदां कलात्मक गुण म्हणून गृहीत धरले म्हणजे त्यांच्याच अनुषंगानें निवेदनाविषयक अनुभवाचा अगदी साधेपणा व शक्य तितक्या अल्पतम विस्तारांत त्याचें उत्कट, कलापूर्ण आविष्करण हेहि दुसरे दोन गुण 'लघुकथे'चे प्राणभूत घटक निर्माण होतात व शरीर, प्राण व आत्मा यांच्याप्रमाणें या तीन गुणांची त्रिपुटी सिद्ध होते. म्हणूनच खऱ्या "लघुकथा" या आपोआप व अपरिहार्यरीतीनें एखाद्याच व्यक्तिच्या व त्याच्या एखाद्याच निवडक अनुभवाच्या परिणामकारक आविष्करणाचें रूप धारण करतात.

आतां हे अनुभव त्या त्या व्यक्तीची हीन अथवा उदास मनोवृत्ति, त्याचें विकारवशित्व व वर्तनदौर्बल्य इत्यादि स्वरूपानें व्यक्त होतात.

प्रस्तुत गोष्टींत नेहमींप्रमाणें प्रणयाचें केवळ कामुक व उद्दीपक वर्णन आणि कोणत्या तरी हताश व दैन्यपूर्ण-रीतीनें नायकनायिकांपैकीं एकाचा किंवा दोघांचा शोचनीय आत्मघात अशा ठशाचें प्रेमाचें स्वरूप दाखविलें नसून प्रेमाच्या आकस्मिक व अढळ स्वरूपाबरोबरच स्वतःच्या व्यवसायांतील कौशल्योत्कर्ष, तज्जन्य उदात्त व पवित्र कर्तव्यनिष्ठा, आणि प्रेमविषयापासून व्यावहारिक उपभोगाच्या रूपानें मोबदला मिळण्याची लेशमात्र शक्यता नसतां केवळ प्रेमाच्याच अढळ व निष्काम निष्ठारूप व्रताचें स्वप्राणार्पणानें यथासांग उद्यापन करण्याची तत्परता, इत्यादि अनेक उज्वल व उपकारक वृत्तींचे विविध व मनोहारी प्रवाह कथानकांत मोठ्या आकर्षक रीतीनें खेळविले आहेत. खुद्द निवेदकाच्या आत्मानुभव निवेदनाच्या प्रबल ओघानुरूप त्याच्या मनोवृत्तींत जे हेलकावे वरखालीं होत होते, तेच तितक्या उत्कटयुक्त आवेशानें निवेदनाच्या भाषेंतही मोठ्या कुशलतेनें चित्रित व प्रतिबिंबित झाले आहेत. त्यामुळें, आपण नेहमींची ठरीव सांचाची एखादी ‘ लघुकथा ’, ‘सत्यकथा’ वाचीत आहों असें वाचकांस न वाटतां, निवेदनांतील

सर्व गोष्टी जणुंकाय प्रत्यक्षच आपल्यासमोर घडत असलेल्या आपण पहात आहोंत, असेंच वाटण्याइतकें तादात्म्य वाचकांच्या मनांत अखेरपर्यंत कायम राहतें; आणि ज्याप्रमाणें संध्याकाळच्या रम्य व प्रशांत समयीं मंदमंद वाहणाऱ्या झुळकेबरोबर एखाद्या स्वच्छ जलाशयावर मृदुकोमल तरंगांची माला जशी एकसारखी पण मंद व संथ रीतीनें वर खालीं होत असलेली दिसते, त्याप्रमाणें गोष्ट वाचून पुरी झाल्यावर कितीतरी वेळपावेतों, एकंदर कथानकाचे संमिश्र संस्कार सहृदय वाचकांच्या मनांत हळुहळूं घोळत राहतात व त्यांना अपूर्व आल्हाद देतात, असाच अनुभव वाचकवर्गास येईल असा आम्हांस भरवंसा आहे. आगबोटीवरील निरनिराळ्या व्यक्ति आणि त्यांच्या विविध मनोवृत्ति व व्यवसाय, लहानशा वस्तींतील 'साहेब' 'गोरा लोग' अधिकारी व त्यांच्या सुखलोलुपविलासी स्त्रीजनांचा ऐषआरामयुक्त व अरेरावी जीवनक्रम,— वगैरेंचीं वर्णनें फार मार्मिक व यथातथ्य आहेत. शिवाय गोऱ्या लोकांच्या नोकरांचें वर्णन करावयाचें म्हणजे, त्यांच्यांतील श्वानवृत्तितुल्य इमानदारीचे वाटेल तितके पोवाडे गाऊन लागलींच त्यांच्या अप्रामाणिकपणा, वंचनप्रियता, पशुतुल्य अज्ञान वगैरे दुर्गुणांचा स्थापनरूपी डांबराचाही दाट लेप चढवावयाचा ही 'अँग्लो-इंडियनांची' किंबहुना एकंदर पाश्चात्यदेशीय लेखकांची एक नसती आढ्यतायुक्त खोडसाळपणाची खोडी आहे.

तरीपणं या गोष्टींतील चिनी नोकराचें व ' नेटिव ' लोकांचें वर्णन फारच मार्मिक व वस्तुस्थितिनिदर्शक आहे, व प्रो. डॉ. घारपुरे यांनीं आपल्या अनुवादांत मुळांतील सारसर्वस्व अत्यंत कुशलतेनें, प्रवाही भाषेच्या साधेपणांत व कलापूर्ण आविष्करणांत मोठ्या डौलानें मांडलें आहे. एका गोष्टीचा मात्र येथें निर्देश केल्यावांचून आमच्यानें राहवत नाहीं. युरोपिअन लेखकांनीं शतकानुशतकें आपल्या ' वाङ्मयाच्या द्वारें,' पौर्वात्य देशांतील लोकाविषयीं कसकसे भलते गैरसमज ' वज्रलेप ' करून ठेविले आहेत याचा विचार केला म्हणजे, त्यांच्या या पुराणप्रियतेचें व गतानुगतिकत्वाचें एकीकडे फार हंसू येतें, पण मिस मेयो वगैरेसारख्यांच्या सहेतुक विषारी प्रयत्नांचा विचार मनांत आला कीं, अत्यंत चीड व सात्विक संताप आल्यावांचून रहात नाहीं. यावरून इतकाच बोध घ्यावयाचा कीं, एकवेळ इतरांनां अन्याय होण्यासारखा प्रतिनिविष्ट मूर्खपणाचा स्वाभिमान पुरवला, पण ' विश्वबंधुत्वाच्या ' व ' निर्विकारपणाच्या ' आत्मघातकी व खोडसाळ अजागळवृत्तीनें, इतरांचें गुणग्रहण करण्याच्या मिषानें जाणूनबुजून आमच्या वाईटावर असणाऱ्यांचे वेळीं अवेळीं गोडवे गाण्याच्या आमच्यांत कांहीं लोकांचे ठिकाणीं सांपडणाऱ्या स्वाभिमानशून्य प्रवृत्तीचा जेव्हां समूळ नायनाट होईल, तो सुदिन !

प्रो. डॉ. घारपुरे यांजतर्फें वाचकांस सादर होत असलेल्या गोष्टीरूप आहेरावरील ‘ आच्छादन ’ हें ! अर्थात् ‘ आच्छादन ’ आपल्यापरी कितीही कलाकुसरीचें असलें, तरी वाचकांची विशेष उत्सुकता ‘ आच्छादन ’ चटकन् दूर सारून, अधिक प्रिय असलेला आंतील ‘ आहेर ’ पाहण्याविषयीं असणें अगदीं स्वाभाविक व सयुक्तिक होय. तेव्हां आतां जास्त वेळ न लावतां प्रस्तावनारूप ‘ आच्छादन ’ काढून घेऊन रसिक वाचकांची दृष्टि ‘आहेरा’वरच अधिष्ठित होण्यासाठीं मी त्यांचा प्रेमपूर्वक निरोप घेतों.

पुणें,<br>
ता. १ मे १९३६

श्री. नि. चापेकर.

---

# आत्मनिवेदन.



इ. स. १९१७ मध्यें मी इंग्रजी पांचव्या ईयत्तेंत असतांना ' जर्मन ' ही दुसरी भाषा म्हणून शिकू लागलों, व इ. स. १९२४ मध्यें ' जर्मन भाषा व वाङ्मय हा ऐच्छिक विषय घेऊन मुंबई विश्वविद्यालयाची ' बी. ए. ' परिक्षा ' ऑनर्समध्यें ' चांगल्या प्रकारें पास झालों. १९३१ सालीं म्यूनिच येथील ' इंडिया इन्स्टिट्यूट ऑफ दी डॉयच अकॅडेमी ' या संस्थेची शिष्यवृत्ती मिळवून व जर्मनींत दोन वर्षें राहून ' जर्मन भाषा व वाङ्मय ' याचा अभ्यास केला व पी. एच. डी. ही पदवी संपादन केली. १९३३ सालीं हिंदुस्थानांत परत आल्यापासून पुणें येथील फर्ग्युसन कॉलेजमध्यें जर्मन भाषेचा प्रोफेसर म्हणून मी काम करीत आहे. अर्थातच

‘ जर्मन भाषा व वाङ्मय ’ हा माझा अत्यंत आवडता विषय आहे.

आपल्या लेखांनीं व ग्रंथांनीं आंतरराष्ट्रीय लोकप्रियता मिळविलेले जे कांहीं लेखक विद्यमान् आहेत, त्यांत जर्मन भाषेंत ग्रंथ लिहिणारे ऑस्ट्रियन लेखक **स्टेफान त्स्वाइग** एम्. ए. यांचा प्रामुख्यानें उल्लेख करावयास पाहिजे. **स्टेफान त्स्वाइग** यांनीं लिहिलेलीं बरींचशीं पुस्तकें लोकप्रिय झालेलीं आहेत. त्यांतल्या-त्यांत ‘कादम्बरिका’ किंवा ‘लघुकादंबरी’ हा वाङ्मय-सांप्रदाय तर त्यांनीं विशेषच लोकप्रिय व लोकादरास पात्र असा करून सोडला आहे. **स्टेफान त्स्वाइग** यांच्या लघुकादंबरीपैकीं विशेष लोकप्रिय अशी जी ‘ आमोक ’ ही लघुकादंबरी वाचकांना अनुवादरूपानें येथें सादर करीत आहे. हा अनुवाद मूळ जर्मन भाषेंतील पुस्तकावरून केलेला आहे; इंग्रजी भाषांतरावरून केलेला नाहीं, हें येथें नमूद करावेसें वाटतें. **स्टेफान त्स्वाइग** यांचीं पुस्तकें किती लोकप्रिय आहेत, हें ह्या पुस्तकास जोडलेल्या त्यांच्या चरित्रावरून दिसून येईल.

सदरहू 'आमोक' या लघुकादंबरीचा 'वेडापिसा' हा मराठी अनुवाद पुणें येथील 'साप्ताहिक सकाळां'तून (हल्लींचे 'प्रभा') मंगळवार ता. १५ जुलै १९३५ ते मंगळवार १ आक्टोबर १९३५ पर्यंतच्या अंकांत क्रमशः प्रसिद्ध झाला आहे, तोच येथें ग्रंथरूपानें प्रसिद्ध होत आहे. या पुस्तकांत **स्टेफान त्स्वाइग** यांचा ब्लॉक दिल्याबद्दल 'साप्ताहिक सकाळ' या पत्राच्या चालकांचा मी आभारी आहे.

**स्टेफान त्स्वाइग** यांनीं आपल्या 'आमोक' या लघुकादंबरीचा मराठींत अनुवाद करण्यास व तो पुस्तकरूपानें प्रसिद्ध करण्यास परवानगी दिल्याबद्दल मी त्यांचा ऋणी आहे. तसेंच मराठी भाषेचे शिल्पकार माझे गुरुवर्य प्रो. **श्री. नि. चापेकर** एम्. ए. एल्‌एल्. बी. यांनीं सदरहू पुस्तक आपल्या व्यासंगपूर्ण प्रस्तावनेनें (आहेरावरील आच्छादनानें) अलंकृत केलें, हें मी माझें मोठें भाग्य समजतों. अनुवादाची हस्तलिखित प्रत सुवाच्य लिहून काढण्याचें काम रा. रा. श्री. भा. भिडे यांनीं मोठ्या आपुलकीनें केल्याबद्दल त्यांचे व शेवटीं हा

अनुवाद छापून पुस्तकरूपानें प्रकाशित करण्याचें काम 'तरुण-साहित्यमाला' इनें पत्करून त्याप्रमाणें व्यवस्था केल्याबद्दल सदर मालेचे संपादक रा. रा. चिं. ब. लेले यांचे आभार मानून व हा अनुवाद वाङ्मयप्रेमी रसिक जनांस आवडेल अशी आशा बाळगून हें आत्म-निवेदन संपवितो.

८१२ सदाशिव, पुणें २.
ता. १ मे १९३६.

नरहर काशिनाथ घारपुरे.

---

# श्री. स्टेफान त्स्वाइग

## यांचें

# चरित्र.



**महायुद्धानंतर** युरोपखंडांत जे प्रख्यात व लोकप्रिय ग्रंथकार उदयास आले त्यांत स्टेफान त्स्वाइग याची प्रामुख्यानें गणना केली पाहिजे. यांचा जन्म ज्यू आईबापांचे पोटीं इ. स. १८८१ मध्यें आस्ट्रियाची राजधानी व्हिएन्ना येथें झाला. त्स्वाइग कुटुंबाची सांपत्तिक परिस्थिती जरा बऱ्यापैकीं असल्यामुळें तरुण स्टेफानला तत्कालिन योग्य तें शिक्षण मिळालें. अगदीं लहानपणापासून वाङ्मयाकडे त्याचा विशेष ओढा असे, आणि म्हणूनच विश्वविद्यालयीन शिक्षणक्रमाला सुरवात करण्यापूर्वींच त्यानें आपल्या स्वतःच्या कविता

दोन भागांत प्रसिद्ध केल्या. तो लहानपणापासूनच साहसप्रिय होता व निरनिराळ्या देशांत हिंडून तेथील नाविन्यपूर्ण देखावे व इतर चमत्कृतिजन्य स्थळें पाहण्याची तीव्र इच्छा त्याला लागून राहिली होती. त्यानें रोम, पॅरीस, लंडन, फ्लॉरेन्स, बर्लिन वगैरे ठिकाणें तर पाहिलींच; शिवाय आफ्रिका, आशिया, उत्तर अमेरिका वगैरे देशांतूनही तो हिंडला. महायुद्धाला सुरवात होईपर्यंत निरनिराळ्या देशांत प्रवास करून तेथील परिस्थिती प्रत्यक्ष पाहून त्या संबंधीची माहिती व ज्ञान स्वदेशांतील लोकांस करून देणें, हेंच तो एक सामाजिक कर्तव्य समजत असे. इतर देशांतील संस्कृतीचा अभ्यास करून त्याचा फायदा स्वदेशास देणें व एका देशांतून दुसऱ्या देशास अध्यात्मिक संदेश पोहोंचविणें हें प्रवाशाचें एक आद्य कर्तव्य आहे अशी त्याची प्रामाणिक समजूत होती व म्हणून प्रवासांत खर्च होणारा वेळ पर-प्रांतासंबंधीचें ज्ञान संपादण्यांत खर्च झाला पाहिजे असें तो मानीत असे.

महायुद्धास सुरवात झाली नसती तर त्याचें बहुतेक आयुष्य भूगोलावरील निरनिराळ्या देशांत भटकून

वैयक्तिक अनुभव व अध्यात्मिक ज्ञान संपादण्यांत गेलें असतें, असेंच म्हणावें लागतें; फार तर त्यास काव्याचा नाद असल्यामुळें आयुष्याचा कांहीं वेळ "फर हेरेन" verhaeren व "फर लेन" Ver laine यांचे किंवा यांच्या-सारख्याच इतर ग्रंथकारांच्या ग्रंथांचें भाषांतर करण्यांत गेला असता.

**स्टेफान** त्स्वाइग शांततेचा कट्टा भोक्ता होता. परंतु महायुद्धाचा वणवा सर्व जगभर पेटला असल्यामुळें स्वतःचीं शांततेचीं तत्त्वें पुस्तकांत उघडरीतीनें मांडण्यांस तो धजला नाहीं. १९२९ सालीं 'जेरेमिआ' Jeremiah या नाटकाची जी अमेरिकेंत द्वितीयावृत्ति निघाली तिच्या प्रस्तावनेंत त्स्वाइग म्हणतो, "महायुद्ध चालू असतांना ज्या कांहीं मनाला असह्य यातना भोगाव्या लागल्या त्यापैकीं भाषण व लेखन-बन्दी संबंधांचा जुलूम ही एक प्रमूख होय. महायुद्धासारख्या मानासिक यातनांच्या काळांत कला ही एकच मनाला विरंगुळा देणारी अमृतवल्ली होय. मला त्या काळीं जें जें कांहीं वाटत होतें तें तें स्पष्ट शद्बांत

बोलण्यास किंवा लिहिण्यास वाव नसल्यामुळें माझ्या मतें एकच मार्ग मोकळा राहिला होता, आणि तो म्हणजे लेखन व्यवसायांत संकेत व ऐतिहासिक पर्यायोक्ति व अन्योक्ति यांचा उपयोग करणें हा होय. अर्थातच शांततेचे पाठ देण्याचे काम मला अप्रत्यक्ष रीतीनें करावे लागत असे. शांतताप्रिय अशा कोणांतरी आदर्शभूत व्यक्ति लोकांचे पुढें ठेवण्याची मला उत्कट इच्छा झाली. माझ्या धर्माचा व जातीचा आद्य उगम सांगणारा जो ग्रंथ, त्यांत दिलेल्या " जेरेमिआ " ह्याच्या आयुष्यक्रमांत तशा प्रकारचा आदर्श मला सांपडला. जेरेमिआ हा युद्धाचा कट्टा शत्रू असून स्वतःची शांतताप्रियतेचीं तत्त्वें प्रस्थापित करण्याकरितां त्यानें बराच छळ सोसला होता.

अशारीतीनें लढाईच्या धुमधडाक्यांत व तत्संबंधी प्रसृत होणाऱ्या असत्य बातम्यांच्या सुळसुळाटांत मी माझी दृष्टी थोडीशी अन्तर्मुख केली व भूतकाळांतील गोष्टी वर्तमान काळांत मांडावयाच्या व सद्यःकालिन घडणाऱ्या गोष्टींना भूतकालीन पेहराव, द्यावयाचा असे मनाशीं ठरविले. व अखिल जगापुढें शांततेचें गोड तत्त्व मांडावें म्हणून " जेरेमिआ " हें नाटक लिहिलें. "

जेरेमिआ या पुस्तकांत संकेताचा बराचसा उपयोग केला आसल्याकारणानें सद्यःस्थितीसंबंधांचा त्यांत सुगावा लागणें सोपें नव्हते; आणि म्हणून तें सुदैवानें आक्षिप्त वाङ्मयाच्या यादींत पडलें नाहीं; अशारीतीनें हजारो लोकांचे दडपून राहिलेले विचार व भावना प्रगट करणारे ' जेरेमिआ ' हें नाटक मूळ जर्मन भाषेंत १९१७ सालीं प्रसिद्ध झालें. महायुद्धाच्या काळांत जर्मनी-ऑस्ट्रियाच्या रंगभूमीवर या नाटकाला प्रवेश मिळणें अर्थांतच शक्य नव्हतें. प्रचलित महायुद्धासंबन्धीच्या वेडाला पायबंद बसावा म्हणून जीं तत्वें ' जेरेमिआ ' या नाटकांत मांडलीं होतीं तीं प्रथमच तटस्थ अशा स्वित्झर्लंड या राष्ट्रांतील त्स्यूरिश या शहरीं १९१७ मध्यें रंगभूमीवर नाटक या रूपानें आलीं.

**जेरेमिआ** या नाटकाचा हा इतिहास मनोरंजक, विचारप्रवर्तक, उद्बोधक असा आहे. महायुद्धानें बसलेल्या मानसिक धक्यामुळें स्टेफान त्स्वाइगला स्वकर्तृत्वाकरितां निरनिराळया क्षेत्रांचा आश्रय घ्यावा लागला. त्याची बहुतेक मित्रमंडळी लढाईच्या वेडाला बळी पडली व स्वतः त्स्वाइग

कांहीं वेळ दिङ्मूढ बनला. महायुद्धानंतर मात्र त्याचे विचारांत फार मोठी क्रांति घडून आली असें म्हणावें लागतें. फ्रेंच राज्यक्रांति व यूरोपांत त्यामुळें उद्‌भवलेली धुमश्चक्री यामुळें ज्याप्रमाणें तत्कालिन वर्डस्वर्थसारखे ग्रंथकर्ते व इतर तत्ववेत्ते भांबावून व वेडावून गेले तद्वतच कांहींशी स्थिती महायुद्धाचे वेळीं स्टेफान त्स्वाइग वगैरे सारख्यांची ही झालेली आढळते. महायुद्धानन्तर गतायुष्य विसरून नवीन आयुष्यक्रमास प्रारंभ करण्याचें त्स्वाइगनें ठरविलें व व्हिएन्ना सोडून तो साल्झबुर्ग या ठिकाणीं राहावयास आला. तदनंतर साहित्यक्षेत्रांत सहेतुक कार्यक्रम आखून लेखन-व्यवसाय करावयाचा असें त्यानें ठरविलें व यूरोपखंडांतील अत्यंत लोकप्रिय व विख्यात अशा ग्रंथकाराच्या मालिकेंत तो लवकरच जाऊन बसला. त्याच्या ग्रंथांचे विशेष म्हटले म्हणजे ते विचार प्रवर्तक उद्‌बोधक व मन खवळून सोडणारे आहेत; म्हणूनच ते इतक्या अल्पावधींत लोकादरास व लोकप्रीतीस पात्र ठरले असून त्यांची भाषांतरेंहि बऱ्याच भाषांतून झालीं आहेत. त्यांच्या फ्रेंच भाषेंत भाषांतर झालेल्या ग्रंथाचें आवृत्तीस सुप्रसिद्ध फ्रेंच ग्रंथकार रोमे रोलंड यानें प्रस्तावना

लिहिली आहे. तसेंच रशियन भाषेंतही त्याच्या बऱ्याच ग्रंथांचें भाषांतर झालें असून त्या ' समग्र-ग्रंथास ' माग्झीम गोर्की या मशहूर रशियन ग्रंथकर्त्यानें प्रस्तावना लिहिली आहे. त्याचे जर्मन व अमेरिकन मासिकांतून प्रसिद्ध झालेल्या लेखांचें व इतर ग्रंथांचें इंग्रजींत भाषांतर करण्याचें बरेचसें श्रेय एडेन व सेडर पाऊल यांना देणें इष्ट आहे. स्टेफान त्स्वाइग याच्या लोकप्रियतेची साक्ष पटण्याकरितां एकच गोष्ट सांगितली म्हणजे पुरे, आणि ती म्हणजे ही कीं; त्याच्या पुस्तकांच्या जर्मन भाषेंत ज्या आवृत्त्या निघाल्या आहेत त्यापैकी कांहीं आवृत्त्या वीसहजार, चाळीस हजार दीड लाख, अडीच लाख इतक्या प्रतींच्या आहेत.

स्टेफान त्स्वाइगच्या ग्रंथांपैकी कांहीं ग्रंथांची अमेरिकन इंग्लिशमध्यें झालेलीं भाषांतरें यासंबंधीं थोडीशी हकीकत खाली दिली आहे.

**१ जेरेमिआः—**(Jeremia) हे एक दुःखपर्यवसायी नाटक असून तें जर्मन भाषेंत प्रथमतः १९१७ मध्यें प्रसिद्ध झालें. त्याची जर्मन आवृत्ति २८००० प्रतींची आहे. त्याचें

इंग्रजींत भाषांतर १९२२ मध्यें झालें. शांततेचे धडे देण्याकरितां लिहिलेलें हे नाटक आहे. त्या संबंधीं हकिकत वर आलीच आहे.

२ व्होलपोन—हें नाटक सुप्रसिद्ध इंग्लिश नाटककार बेन जानसन् याच्या विख्यात Volpone या नाटकाचा जर्मन अनुवाद आहे. हें आनंदपर्यावसायी नाटक असून १९२८ मध्यें प्रसिद्ध झालें व त्याचवर्षी त्याचे प्रयोग युरोप व अमेरिका या दोन खंडांतील रंगभूमीवर करण्यांत आले.

३ थ्राय मास्टर—Three Masters त्स्वाइगच्या मतानें १९ व्या शतकांतील सुप्रसिद्ध असलेले तीन कादंबरीकार बालझॅक ( फ्रेन्च ), डिकन्स ( इंग्लिश ), डोसटॉव्हस्की ( रशियन ) ह्यांचीं चरित्रें या ग्रंथांत दिलीं आहेत. हें पुस्तक जर्मन भाषेंत ज्यावेळीं प्रसिद्ध झालें त्यावेळीं ३०००० प्रतीची आवृत्ती काढली होती. त्याचें १९३० मध्यें इंग्लिश भाषांतर प्रसिद्ध झालें.

४ योसेफ फौश—( Joseph Fouche ) ह्या पुस्तकांत एक राजकारणी पुरुष फ्रेन्च राज्यक्रांतीच्या वेळीं कसा

उदयास आला व नेपोलियनच्या अमलाखालीं पोलिस खात्यांचा मुख्य कसा झाला वगैरे गोष्टी सांगितल्या आहेत. हा चरित्र ग्रंथ असून ह्याच्या जर्मन आवृत्तीच्या वेळीं ४८ हजार प्रती काढल्या होत्या. ह्याचें इंग्रजींत भाषांतर १९३० मध्यें झालें.

**५ रोमे रोलन्ड**—( Romain Rolland ) या ग्रंथ-कर्त्यासंबंधीं चरित्रपूर्ण निबंध

**६—ड्राय डिश्टर ईरेस लेबेन्स** ( Adpets in self-portraiture ) या पुस्तकांत कासानोव्हा, स्टेंडालव टॉलस्टॉय यांच्या ग्रंथासंबंधीं विवेचन असून त्यापासून तरुण पिढीनें काय धडे घ्यावयाचे ह्याचा उहापोह केला आहे. जर्मन आवृत्ती २०००० प्रतींची बनली असून इंग्रजी भाषांतर १९२८ मध्यें प्रसिद्ध झालें.

**७ डी हायलुंग डुर्श डेन गाइस्ट**—( Mental Healers ) हा एक निबंध असून ह्याची जर्मन आवृत्ती २०००० प्रतींची आहे.

**८ फराविरुंग डेर गेफ्युल**—ह्यांत विचारप्रवर्तक अशा तीन लघुकादंबऱ्या आहेत. जर्मन आवृत्तींत प्रती ९००००

९ ब्रेनेन्डेस गेहायाम्निस–( Burning Secret ) ही कादंबरी असून जर्मन आवृत्तींत प्रती १४००००

१० स्टेर्नस्टुंडेन डेर मेन्शहाइट ( फ्युन्फ हिस्टोरिश मिनिआटुरेन )–( Five Historical Miniatures ) जर्मन आवृत्ती २५०००० प्रतींची.

याशिवाय त्यानें अनेक लघुकादंबऱ्या लिहिल्या आहेत. Kaleidoscope, Passion & Pain, Invisible, collection, Amok वगैरे अनेक इंग्रजींत भाषांतरें झालेले ग्रंथ व लघुकादंबऱ्या नांव घेण्यासारख्या आहेत. स्टेफान त्स्वाइग याचे जर्मन ग्रंथ लाइपझिग ( जर्मनी ) येथील इन्सल फरलाग् या कंपनीनें प्रसिद्ध केले असून इंग्रजी भाषांतरें एडेन व सेडर पाऊल यांनीं केलीं असून तीं अमेरिकन पब्लिशिंग कंपनीनें प्रसिद्ध केलीं आहेत.

स्टेफान त्स्वाइग यानें लघुकादंबरी, ज्याला Novellete असें म्हणतात, ह्या वाङ्मयाचा प्रकार सरसहा उपयोगांत आणून तो अत्यंत लोकप्रिय करून दाखविला आहे. त्याचें

बरेचसें मार्मिक व हृदयस्पर्शी लिखाण ह्याच प्रकारांत लिहिलेलें आढळतें.

प्रसिद्ध जर्मन ग्रंथकार स्टेफान त्स्वाइग याच्या चरित्रा-संबंधीची ही माहिती "Living Authors—A book of Biographies" edited by Dilly Tante published by the H. W. Wilson Company, New York. 1932. या पुस्तकाचे आधारें घेतली आहे.

---

इसवी सन १९१२ मधील मार्च महिन्यांतली गोष्ट. नेपल्स बंदराला " ओशिआनिया " नांवाचें, सामानानें भरलेलें एक बरेंच मोठें जहाज लागलें व त्यावरचें सामान किनाऱ्यावर उतरवून घेण्याचें काम मोठ्या जारीनें सुरू झालें. अशावेळीं आकस्मिकपणें एक अपघात घडला व त्याची माहिती थोड्याच दिवसांत पुष्कळशा वर्तमानपत्रांत झळकूं लागली. परंतु असत्य व अतिशयोक्ति यांनीं ती चटकदार बनविली होती. तो अपघात घडताना मी स्वतः प्रत्यक्ष कांहीं पाहिला नाहीं, कारण [ इतर प्रवाशांप्रमाणेंच बंदरांतल्या एकंदर गडबडीला व कोलाहलाच्या घाणीला कंटाळून ] मनाची कांहीं करमणूक करावी म्हणून मी नेपल्स शहरांत गेलों होतों. एखादें मोठें जहाज

बंदरास लागलें कीं सामानाची चढउतर सुरुं होते व अशा-वेळीं बहुतेक प्रवासी गांवांत जाऊन थोडासा पाय मोकळा करून येतात. मी जरी तो अपघात घडताना प्रत्यक्ष पाहिला नसला, तरी मला जी माहिती आहे तीवरून तो कां व कसा घडला हें मी सांगूं शकेन. आणि एकंदर ज्या गोष्टींविषयीं मी आतां सांगणार आहे त्या घडल्याला बरेच दिवस होऊन गेले असल्यामुळें त्या आतां सविस्तर जशांच्या तशा सांगण्यास कांहीं हरकत नाहीं असें मला वाटतें.

मला " ओशिआनिया " बोटीनें परत युरोपास जावयाचें होतें व म्हणून त्या बोटकंपनीच्या कलकत्ता येथील एजंटच्या ऑफिसांत मी माझ्याकरितां एक केबिन-बर्थ राखून ठेवावी म्हणून सांगण्याकरितां गेलों होतों, परंतु मला बोटीवर जागा मिळेल किंवा नाहीं हें त्या एजंटास त्यावेळीं नक्की असें कांहींच सांगतां येईना; कारण तो म्हणाला, " पावसाळ्याच्या प्रारंभी जहाज बहुतेक ऑस्ट्रेलियन लोक व त्यांचें सामान यांनीं गच्च भरून येतें व म्हणून प्रथम मला सिंगापूरला तार करून बोटी-वर जागा शिल्लक आहे कीं नाहीं हें विचारलें पाहिजे." एकदोन दिवसांत त्या एजंटाचें मला पत्र आलें कीं कसें तरी करून माझेकरितां बोटीवर जागा केली आहे. तें पत्र वाचल्या-वर आपल्याला परत यूरोपला, आपल्या घरीं जावयास मिळणार

म्हणून मला खरोखर फार आनंद झाला. मात्र माझी केबिन यथातथाच होती. कांहीं असलें तरी घरीं परत जावयास मी फारच उतावळा झालों होतों व केबिनसंबंधीं इतर माहिती कळविण्याविषयीं मी त्या एजंटला लिहिलें.

तो एजंटहि भला माणूस होता असें दिसतें, कारण त्यानें कांहींही फुगवून न लिहितां जशी खरी वस्तुस्थिती होती त्याचेंच वर्णन केलें होतें. जहाज सामानानें अगदीं गच्च भरलेलें असून, मला ज्या केबिनमध्यें जागा दिली होती, ती म्हणजे स्टीमएंजिनजवळची एक लहानशी चौकोनी जागा होय. त्या जागेंत पोर्टहोल नसून हवा व प्रकाश येण्यासाठीं मात्र एक लहानसें छिद्र होतें व त्यांतून समुद्राचा अगदीं थोडासा भाग वगळल्यास, इतर कांहींही दिसणें शक्य नव्हतें. एखाद्या अंधाऱ्या खोलींत ज्याप्रमाणें पाकुळीनें एकदम तोंडा-वर झडप मारावी, त्याप्रमाणें त्या अत्यंत लहानशा गवाक्ष-द्वारांतून समुद्रावरची वाऱ्याची झोत एकदम तोंडावर आदळली म्हणजे वाटत असे. खालून येणारा एंजिनचा धडधड आवाज, एंजिनकडे कोळसे घेऊन जाणाऱ्या मजुरांच्या पायांचा लोखंडी जिन्यावरून जातां येतांना होणारा दणदण आवाज, व प्रोमेनेड डेकवर इकडून तिकडे व तिकडून इकडे बुटांचा करकर आवाज करीत फिरणाऱ्या लोकांच्या पावलांचा आवाज अशा

या आवाजांच्या त्रिवेणी संगमामुळें तर डोकें उठून जाण्याची पाळी येई. माझ्याजवळ असलेलें सामानसुमान मी जरा [ त्यांतल्या त्यांत कां होईना ] केबीनच्या एका कोपऱ्यांत लावलें व वरती डेकवर आलों. तेथें थोडा वेळ शुद्ध हवा व मंजुळ वारा मिळाल्यावर मला कांहींसें बरें वाटलें.

ह्या सामानांनीं व उतारुंनीं भरगच्च भरलेल्या जहाजाच्या प्रोमेनेड डेकवरहि जिकडे तिकडे धांदल व गडबड दिसत होती. डेकवर प्रवाशांनीं एकच गर्दी केली होती. समुद्रावरून लांबचा प्रवास केलेल्या कोणाहि इसमास हें माहित असेलच, कीं केबीन कितीहि स्वच्छ व शृंगारलेली असली तरी डेकवर जास्त बरें वाटत असल्यामुळें बहुतेक प्रवासी डेकवरच गर्दी करतात, कारण तेथें शुद्ध व स्वच्छ हवा मिळत असल्यामुळें मळमळणें, ओंकारी येणें वगैरे गोष्टींपासून फार कमी त्रास होतो. आमच्या ह्या डेकवरहि बरेंचसें प्रवासी आळशांप्रमाणें इकडून तिकडे व तिकडून इकडे येरझारा घालीत होते. कांहीं नर्व्हस मनाचे लोक बोटीच्या हलण्याकडे आपलें लक्ष जाऊं नये व बोट लागण्याचें होतां होईल तों टळावें म्हणून एकमेकांशीं सारखे बोलत होते. जों जों मनुष्य बोटीच्या हलण्याकडे लक्ष देईल तों तों बोट आपल्याला जास्त जास्तच लागतें आहे असें त्याला वाटूं लागतें. कांहीं स्त्रिया डेकवरच्या इझीचेअरवर पाय ताणन

पडल्या होत्या, व चिमण्यांच्या चिंवचिंव आवाजाप्रमाणें त्यांच्या तोंडाची टकळी सारखी चालूच होती. पूर्वेकडील देशांतून प्रवास करीत असतांना मी खरोखरच परदेशांतून प्रवास करीत आहे असें मला वाटत असें, कारण तेथल्या त्या निरनिराळ्या गोष्टी पाहिल्यावर मला एक प्रकारचे समाधान वाटत असें, आपण ह्या निरनिराळ्या देशांत ज्या कांहीं चमत्कृतिजन्य व नवीन गोष्टी ऐकिल्या व पाहिल्या त्यांची पुनः आठवण करून त्यांचें मनन करणें मला त्यावेळीं किती तरी आवडलें असतें, परंतु डेकवर चालू असलेल्या त्या गोंधळांत तें कोठलें साधायला! बरें थोडेसा कांहीं पुस्तक वगैरे वाचण्याचा प्रयत्न करावा तर प्रवाशांच्या बोलण्याचा तो गुणगुण आवाज एकाद्या मधमाशी-च्या किंवा डांसाच्या गुणगुणण्याप्रमाणें कानांत भरून राहिला होता. शिवाय एकाद्या येरझारा घालणाऱ्या प्रवाशाची सांवली पुस्तकाच्या पानावर पडली कीं अगोदरच दमलेल्या माझ्या डोळ्यांना मला जास्त ताणहि देववेना. एवंच काय, तसल्या त्या गंडबडींत व धांदलींत कोणत्याहि प्रकारचें वाचन किंवा मनन अशक्य होतें.

अशा रीतीनें प्रवासाचें तीन दिवस निघून गेले परंतु मनाला शांतता म्हणून कसली ती मिळेना. डेकवर मी पुष्कळ-वेळां प्रवाशांचीं तोंडें पहात बसत असें. समुद्र काय, रोजच्या

प्रमाणें अगदीं शांत व लांबचलांब असा पसरलेला होता. नाहीं म्हणावयास रात्रीं मात्र जहाजावरच्या दिव्यांचा प्रकाश समुद्राच्या लाटांवर पडून थोडीशी मजा दिसे इतकेंच. तीन दिवसानंतर प्रवाशांच्याकडे पाहाण्याचाहि मला कंटाळा येऊ लागला. कारण रोजरोज तींच माणसें व तेच चेहरे. त्यांच्या चेहऱ्यांचा अवयव अन् अवयव आतां माझ्या इतक्या पूर्ण परिचयाचा झालेला होता कीं, त्यांचें मुखावलोकनहि करूं नये असें वाटूं लागलें. स्त्रियांचें तें खिदीखिदी हंसणें, घरीं परत जाणाऱ्या त्या डच ऑफिसरांची बाचाबाची व हमरीतुमरीवर येणें ह्या गोष्टी तर नित्य परिचयाच्याच झाल्या होत्या. मी डेकवरून उठलों व सलूनमध्यें थोडावेळ शांततेंत घालवावा म्हणून तेथें आलों, परंतु थोड्याच वेळांत प्रवास करणाऱ्या कांहीं इंग्लीश मुली तेथें आल्या व त्यांनीं तेथल्या पियानोवर " वाल्झ " नांवाचें नृत्यसंगीत कर्णकठोर पद्धतीनें वाजविण्यास सुरवात केली. त्यामुळें तर माझा कपाळशूळच सुरूं झाला. शेवटीं केबीनकडे परतण्याशिवाय दुसरा मार्गच राहिला नाहीं. कशी तरी "लंच" आटोपली, बीयरच्या दोन बाटल्या खांकोटीला मारल्या व यापुढें संध्याकाळीं होणाऱ्या डिनरला व डान्सला हजर न राहाण्याचा निश्चय करून, बीयर ठोकून गाढ झोंपी जावयाचें व अशा रीतीनें तरी स्वस्थता व शांतता मिळाली तर पाहावी म्हणून केबीनमध्यें आलों.

ज्यावेळीं मी जागा झालों तेव्हां केबीनमध्यें अंधार पसरलेला होता; व मला तर अगदीं गुदमरल्यासारखे होत होते. मी विजेचा पंखा बंद केला असल्यामुळें घामानें अगदीं डबडबलों होतों. बराच वेळ झोंपेंत गेल्यामुळें माझें डोकें अगदीं जड झालें होतें; व मी कोठें आहे ह्याची बरोबर जाणीव होण्यास मला थोडावेळ लागला. बहुतेक मध्यरात्र उलटून गेली असावी, कारण नृत्य करतांना होणारा पावलांचा आवाज किंवा त्या बरोबर वाजविल्या जाणाऱ्या संगीताचे सूर यापैकीं कांहींच ऐकूं येत नव्हते. त्या राक्षसी जहाजाच्या यंत्रांचा आवाज व तें प्रचंड जहाज आपलें ओझें घेऊन समुद्रांत अंधारांतून आपला मार्ग काढीत असतां होणारा करकर ध्वनि याशिवाय कांहींही ऐकूं येत नव्हते.

मी माझ्या केबीनमधून बाहेर पडलों व चांचपडत, चांचपडत डेकवर आलों. प्रथमतः जहाजाच्या धुरड्यांतून बाहेर पडणाऱ्या त्या ठिणग्या व धुरांचे लोट यांकडे माझें लक्ष गेलें व मग मी वर आकाशाकडे पाहिलें. आकाश अगदीं स्वच्छ व निरभ्र होतें. मधूनमधून त्या निळ्या शालूवर तारकांची खडीच काढली आहे असें वाटे. एकवेळ असेंहि वाटे कीं, कसल्या तरी मोठ्या प्रकाशासमोर आकाशरूपी एक आच्छादनच धरलें आहे व तारकांचा प्रकाश म्हणजेच त्या आच्छादनाला असणाऱ्या

छिद्रांतून बाहेर पडणारा प्रकाश आहे कीं काय ! अशाप्रकारची आकाशाची सुंदर शोभा मी पूर्वी कधींहि पाहिली नव्हती.

आतां जरी जहाज विषुववृत्ताजवळून चाललें होतें तरी सुद्धां रात्रीं बराच गारठा होता. दूर अंतरावर पसरलेल्या लहानलहान बेटांवरून वाहात येणारा वारा मनाला आल्हाद देत होता. बोटीवर पाय ठेवल्यापासून प्रथमत: आतांच मला आपण स्वप्नसृष्टींत आहोंत काय, किंवा नसल्यास स्वप्नसृष्टींत वावरावें असें वाटूं लागलें. डेकवरच्या एखाद्या इझिचेअरवर पडून तारकापुंजांनीं भरून गेलेल्या त्या आकाशाकडे पाहात राहावें असेंहि मला वाटलें. परंतु सर्वच इझीचेअर्स गुंडाळून त्यांचा एक ढीग घालण्यांत आला असल्यामुळें, माझ्यासारख्या स्वप्नसृष्टीला हापापलेल्याला एकहि जागा त्या मोठ्या डेकवर नव्हती.

शेवटीं मी दोरखंड व लोखंडी साखळ्या ह्यांच्यावर धडपडत व हापटत जाहाजाच्या पुढच्या भागापुढें आलों व कांहीं दोरखंडावर रेलून जहाजाचा पुढचा भाग समुद्राच्या लाटांना कांपीत आपला मार्ग कसा काढीत होता ह्याकडे दृष्टी लाऊन पाहात होतों.. मी तेथें किती वेळ उभा होतों कोणास ठाऊक ! जहाजांत—त्या राक्षसी पाळण्यांत—हेलकावे खात

खात मी आपला वेळ घालवीत होतों. माझी तीव्र इच्छा म्हणजे झोंपी जावें किंवा शांत कोठें तरी पडून मनचे मनोरे रचण्यांत मग्न व्हावें, परंतु डेकवरचा तो देखावा पाहाण्याचे सोडून केबीनमध्यें जाण्याकडे माझें मन घेईना. शेवटीं एका दोरखंडाच्या ढीगावर मी तेथेंच बसलों, आणि रात्रीच्या एकंदर देखाव्यानें गुंगी येऊन माझे डोळे मिटून मी कल्पनासृष्टींत संचार करूं लागलों. हळूंहळूं मी सत्यसृष्टीपासून दूरदूर जातों आहे असें मला वाटलें व मला जो आवाज ऐकूं येत होता, तो माझ्या स्वतःच्या श्वासोश्वासाचा कीं जहाजाचें हृदय जें स्टीमएंजीन त्याचा हेंहि कळेनासें झालें. शेवटीं मी हलकेंहलकें त्या मध्यरात्रीं निशादेवीच्या अंमलाखालीं जात चाललों.

× × × × ×

अशारीतीनें मी माझ्या तंद्रींत बसलों असतां, एकाएकीं कोणीतरी खोंकल्याचा आवाज माझ्या कानावर येऊन आदळला, मी एकदम भानावर येऊन डोळे उघडले व तेथल्या त्या अंधारांत कोण खोंकलें हें शोधक दृष्टीनें पाहूं लागलों. माझ्यापासून जवळच मला चष्म्याच्या कांचा चकाकतांना व त्याच्या खालीं दोन तीन इंचावर थोडेसा पेटलेला पदार्थ व धूर दिसूं लागला. अर्थातच कोणीतरी चष्मा लावलेली व्यक्ति

सिगारेट ओढीत असलेली माझ्याजवळ बसलेली आहे असें मला दिसूं लागलें. माझें सर्व लक्ष सागर व तारका यांच्याकडे लागले असल्यामुळें त्याच तंद्रींत मी तेथें खालीं बसलों होतों व म्हणूनच माझ्याशेजारीं अगदीं हालचालसुद्धां न करितां बसलेल्या त्या गृहस्थाविषयीं मला कांहींच कळलें नाहीं. मला वाटलें कीं हाच गृहस्थ येथें प्रथमतः येऊन बसला असावा व आपण मात्र त्याचा शांतताभंग उगीचच्या उगीच केला. मला ही कल्पना सहन झाली नाहीं म्हणून मी त्याला माझ्या जर्मन मातृभाषेंत म्हणालों " कृपा करून मला क्षमा करा, " परंतु तावडतोब उत्तर आलें " छे, छे, तसें मुळींच नाहीं, " आणि आश्चर्य हें कीं तें उत्तरहि अत्यंत शुद्ध व योग्य ठेक्यांत असें जर्मन भाषेंतच आलें.

अशाप्रकारें एखाद्या अज्ञात मनुष्याचा त्या अंधारांत तो तसा सहवास घडावा ह्याचें मला फारच आश्चर्य वाटलें व माझी स्थिती थोडीशी चमत्कारिक झाली. मला असा भास होऊं लागला कीं, ज्याप्रमाणें त्या अज्ञात व्यक्तिकडे मी बावळटा-सारखा पाहात आहे. त्याचप्रमाणें ती अज्ञात व्यक्तिहि माझ्याकडे पाहात आहे त्या अंधःकारांत ती व्यक्ति स्पष्ट दिसणें शक्यच नव्हते. परंतु मधूनमधून त्या व्यक्तीच्या श्वासोश्वासाचा ध्वनि ऐकूं येई व सिगारेटचा धूर डोळ्यांना अंधुकअंधुक दिसें एवढेंच.

आतां मात्र मला ही स्तब्धता असह्य होऊं लागली. येथून आतां एकदम उठावें व चालतें व्हावें असें मला वाटूं लागलें. परंतु दुसरें क्षणीं माझी अशी खात्री झाली कीं, एकहि शब्द न बोलतां जाणें म्हणजे अगदींच उद्धटपणा होईल. असल्या त्या गोंधळलेल्या स्थितींत मी एक सिगारेट काढली व ती शिलगवण्याकरितां काडी ओढली. एकदोन सेकंदच पडलेल्या त्या काडीच्या प्रकाशांत आम्हीं एकमेकांस पाहूं शकलों. मला एका अनोळखी माणसाचा चेहरा दिसला, त्याला मी बोटीवर आतांपर्यंत कोठेंहि पाहिला नव्हता. तो डायनिंग सलूनमध्यें किंवा डेकवरहि केव्हांच माझ्या दृष्टीस पडला नाहीं. जहाजावरून प्रवास केलेल्या लोकांस हे माहित असेलच कीं डायनिंग हॉलमध्यें जहाजावरची प्रवासी मंडळी जेवण्याच्या वेळीं एकत्र येतात व डेकवर फिरण्यास किंवा गप्पा मारण्यास आला नाहीं असा प्रवासी विरळाच ! काडीच्या उजेडांत मला त्या गृहस्थाच्या चेहऱ्याची फक्त रूपरेषाच दिसल्यामुळें कीं काय, पण तो चेहरा अत्यंत म्लान व ओढलेला असा वाटला. लगेच काडीचा प्रकाश संपल्यामुळें मला त्याचा चेहरा नीट न्याहाळून पहाण्याची विशेष संधी मिळाली नाहीं व पुनः झालेल्या त्या अंधःकारांत तो सिगारेटचा धूर व त्या चष्म्याच्या काचा एवढेंच चकाकूं लागलें. आमच्यापैकीं कोणीच बोलेना. ऊष्ण कटिबंधांतील ऊष्ण व गुदमरणाऱ्या हवेप्रमाणें ती शांतता आतां अत्यंत गुदमरणारी व असह्य झाली.

शेवटीं मी उभा राहिलों व " गुडनाइट " म्हणालों. अत्यंत कठोर व घोगऱ्या आवाजांत उत्तर आलें "गुडनाइट". लगेच मी त्या दोरखंडाच्या ढीगांतून अडखळत अडखळत जाऊं लागलों तोंच माझ्या मागें पावलें वाजूं लागलीं. माझ्या शेजारींच अंधारांत दोरखंडाच्या ढीगावर बसलेला तो अज्ञात गृहस्थ माझ्यामागें येत होता. तो जरी अगदीं माझ्या जवळ आला नसला तरीसुद्धां त्या अंधारांतहि त्याच्या चेहेऱ्यावर काळजी व अस्वस्थता स्पष्ट दिसत होती.

तो अत्यंत घाईनें बोलूं लागला, " माझ्यावर दया दाखवा अशी जर मी याचना केली तर क्षमा कराल......" तो अडखळला, " अशा प्रकारें कोणालाहि न कळतां स्वतःस या जहाजावर अशा प्रकारच्या दुःखद व शोकाकुल परिस्थि-तींत वावरूं देण्यांत मला माझी अत्यंत महत्वाची अशी खाजगी कारणें आहेत. ह्याच कारणांमुळें या प्रवासांत मी कोणाशीं ओळख करून घेतली नाहीं. त्याला अपवाद म्हणजे फक्त तुम्हीच......माझी इच्छा काय आहे तें तुम्हीं......मला एवढेंच सांगावयाचें आहे कीं तुम्हाला या बोटीवर माझ्या-सारखा कोणी माणूस भेटला वगैरे कोणालाहि सांगण्यापासून जर आपण अलिप्त राहिलात तर माझ्यावर फार मोठा उपकार होईल. मला पुनः आपणांस सांगितलें पाहिजे कीं माझ्या कांहीं

विशेष महत्वाच्या खाजगी कारणामुळेंच मीं ह्या जहाजावरच्या कोणत्याच गोष्टींत भाग घेत नाहीं. मी वारंवार रात्रीच्या वेळीं जहाजाच्या या पुढच्या भागावर येऊन बसतों हे जर तुमच्या कडून कोणाला कळलें तर मला फारच वाईट वाटेल व माझी अत्यंत निराशा होईल. ”

जरा वेळ तो थांबला. मी लगेच त्याच्या इच्छेप्रमाणें वागण्याविषयीं त्याला आश्वासन दिलें. मी काय एक लहानसा नैमित्तिक प्रवासी असून माझे या बोटीवर कोणी मित्र नाहींत असें मी त्याला सांगितलें. मी त्याच्याशीं हस्तांदोलन केलें व झोप घ्यावी ह्या हेतूनें केबीनमध्यें आलों. परंतु मला शांत झोप आली नाहीं, कारण मला विचित्र स्वप्नें पडूं लागलीं.

ह्या घडलेल्या प्रसंगांसंबंधीं कोणाला कांहींहि न सांगण्याविषयींचें माझें वचन मी पाळलें. बाकी तसें सांगण्याविषयींचा मोह मला पुष्कळ वेळा आवरावा लागला. समुद्रावरच्या प्रवासांत एखादी साधी घडलेली गोष्टसुद्धां जरा महत्वाची वाटते व म्हणून या चमत्कारिक प्रवाशाबद्दल मला राहून राहून मोठें आश्चर्य वाटत होतें. त्याला कोणतें नांव शोभेल व त्याचें नांव काय असेल हें समजून घेण्याकरितां मी बोटीवरील प्रवाशांच्या नांवाच्या यादीचें पुस्तकहि चाळलें. त्याचप्रमाणें जाणाऱ्या

येणाऱ्या प्रवाशाच्या चेहेऱ्याकडे त्याला ह्या गृहस्थाविषयीं कांहीं माहिती आहे काय हें जाणण्याच्या उत्सुकतेनें, सूक्ष्म नजर टाकीत असे. सर्व दिवसभर मला सारखी अधीरता वाटत होती. रात्र झाल्यावर तरी निदान तो पुनः मला भेटेल याकरितां मी रात्र पडण्याची मार्गप्रतिक्षा करूं लागलों. आपण ज्या स्त्रीवर प्रेम करतो ती मिळविण्याविषयीं मनुष्याला अनिवार इच्छा होणार नाहीं इतकी अनिवार व अमर्याद इच्छा मला त्या गृहस्थाचें गौप्य समजून घेण्याची झाली. अर्थातच तो दिवस मला नेहमींपेक्षां जास्त मोठा वाटला. मी जरा लवकरच बिछान्यावर जाऊन पडलों, परंतु मनांत मात्र अशी भीति वाटत होती कीं मध्यरात्र उलटल्यावर मी पुन: जागा होईन

आणि शेवटीं तसेंच झालें. आदल्या रात्रीं मी ज्यावेळीं जागा झालों होतों, त्याचवेळीं मी आजहि जागा झालों. मी माझ्या रेडियम असलेल्या घड्याळाकडे पाहिलें तों बारा वाजून गेले होते. मी झटकन् उठलों व डेककडे निघालों.

उष्ण कटीबंधांत उत्तरेकडील प्रदेशांतल्यासारखी हवा थिल्लर नसते व म्हणून तिच्यांत फारसा फरक होत नाहीं. पूर्वरात्रीप्रमाणें आजहि अंधार असून आकाश निरभ्र असून तारकांनीं फुलून गेलें होतें. बाह्य सृष्टींत जरी कांहींच फरक

नसला तरी माझ्यांत आज केवढा फरक झाला होता. रोजच्या-प्रमाणें आज मला जहाजाच्या मागें पुढें डोलण्यानें गुंगी आली नाहीं कीं आपण नेहमीं स्वप्नसृष्टींतच निमग्न असावें असेंहि वाटलें नाहीं. कांहींतरी एक मोठी अदृश्य व अनिवार इच्छा मला डेकवरच्या पुढच्या भागाकडे खेंचित आहे असें वाटलें.

तो अज्ञात परका मनुष्य आजहि त्या डेकवरच्या पुढच्या भागावरच्या दोरखंडाच्या वेटोळ्यावर बसला असेल काय हें जाणण्याची मला तीव्र इच्छा झाली. अशारीतीनें उत्सुकता व नाखुषी यांचें द्वंद्व माझ्या मनांत सुरू झालें. एकदां वाटे तिकडे जाणें प्रशस्त होणार नाहीं; परंतु शेवटीं मी माझ्या तीव्र इच्छेलाच बळी पडलों. मी जेव्हां त्या जागेच्या अगदीं जवळ आलों तेव्हां मला पुनः तेथें सिगारेटचा धूर व काजव्याप्रमाणें चमकणारी ती सिगारेट दिसूं लागली.

मी एकदम थांबलों व परत जाण्याच्या बेतांत होतों, एवढ्यांत ती अंधःकारांत असलेली आकृति उठली, दोन पावलें पुढें आली व शेवटीं अगदीं माझ्याजवळ येऊन, क्षमा याचनेच्या व काकुळतीच्या आवाजांत म्हणाली, "क्षमा करा, मला वाटतें तुम्हीं तुमच्या नेहमींच्या जागीं परत येत होता, आणि मला त्या ठिकाणीं पाहिलें म्हणून तुम्हीं परत फिरलात. आपण येथें बसणार नाहीं कां ? मी येथून उठणारच होतों."

मी लगेच उत्तर दिलें कीं माझ्या पासून त्याला त्रास होईल म्हणून मी परत जात होतों, आणि मला वाटलें कीं तो तेथेंच थांबेल म्हणून.

" छे, छे, तुमचा मला मुळींच त्रास होणार नाहीं, " तो थोड्या निराशेनें म्हणाला " त्रास कसला आला आहे त्यांत उलट एकदां तरी कांहीं वेळ मला मनुष्याचा सहवास घडतो म्हणून आनंदच होत आहे. कारण दिवसामागून दिवस किती तरी गेले असतील पण मी कोणाहि मनुष्यप्राण्याशीं भाषण केलेलें मला स्मरत नाहीं. दिवसच काय, पण कदाचित वर्षेंहि झालीं असतील. शिवाय सर्वच गोष्टी स्वतःच्या अंतःकरणांत कोंडून ठेवणें मला असह्य झालें आहे. केबीनमध्यें मला क्षण-भरहि बसवत नाहीं. कारण ती जागा मला तुरुंगांतील अंधार-कोठडीप्रमाणें वाटते. त्याचप्रमाणें दुसरे इतर प्रवासीहि मला आवडत नाहींत, कारण त्यांची सारखी वटवट व खिदळणें चालू असते. त्यांच्या सतत चाललेल्या चेष्टा कुचेष्टांनीं मनुष्य खरोखरच वेडा बनावयाचा, इतकेंच काय पण त्यांच्या त्या मूर्ख बडबडीचा आवाज मी केबीनमध्यें असलों तरी माझ्या कानावर येऊन आदळतो व अशा वेळीं मला माझे कान बंद करावे लागतात. अर्थातच त्यांची ती बडबड मला ऐकूं येते किंवा त्यापासून मला त्रास होतो याची जाणीव त्यांना थोडीच

असणार. आणि जरी असली तरी त्याची पर्वा ते काय म्हणून करतील ? कारण ते बोलूनचालून परकेच. ”

नंतर तो मध्येंच एकदम दचकला व म्हणाला, “ माझें हें बोलणें तुम्हांला कंटाळवाणें झालें असेल परंतु माझ्या मनांतून तुम्हाला मुळींच त्रास द्यावयाचा नव्हता. ”

त्यानें माझ्यापुढें मान वांकवली व तो जावयास निघाला. मी त्याला थांबवून धरलें व म्हणालों, “ तुमच्या बोलण्याचा मला मुळींच त्रास झाला नाहीं, किंवा कंटाळाहि आला नाहीं. कारण अशा या निरभ्र व तारकांनीं सुशोभित अशा आकाशाखालीं बसून शांतपणानें बोलण्यापासून मलाहि आनंदच वाटेल. बरें, पण आपण सिगारेट घेतां कां ? ”

त्यानें सिगारेट घेतली व ती शिलगवण्याकरितां काडी ओढली. त्या काडीच्या प्रकाशांत मला त्याच्या चेहऱ्याचें दर्शन झालें व तो चेहेरा माझ्या ओळखीचा बनला. तोहि, क्षणभरच कां होईना, पण त्या प्रकाशांत आपल्या चष्म्यांतून माझ्याकडे अत्यंत गंभीर, शोधक व याचक दृष्टीनें टक लावून पाहात होता. माझें शरीर भीतीनें थरारलें. ह्या मनुष्यास कांहींतरी स्वतःची कहाणी सांगण्याची तीव्रता भासत असली पाहिजे. परंतु कांहींतरी अंतःकरणांतील भावना त्याला मागें खेचीत आहेत

असें स्पष्ट दिसत होतें. शांतता व त्यापासून उत्पन्न होणारा दुसऱ्याविषयीचा विश्वास हीच त्या भावनेची पकड ढिली करूं शकली असती.

शेवटीं आम्ही दोघेहि त्या दोरखंडाच्या ढिगावर एकमेकासमोर असे बसलों. तो इतका नर्व्हस झालेला दिसत होता कीं ज्या हातांत त्यानें सिगारेट धरली होती, तो हात थरथर कांपत होता. आम्ही दोघेहि सिगारेट ओढीत होतों, परंतु कोणीच कांहीं बोलेना. सरतेशेवटीं त्यानेंच बोलावयास सुरवात केली.

" तुम्हीं दमला आहांत काय ? " तो म्हणाला.

" छे, बिलकुल नाहीं, " मी म्हणालों.

" मला तुम्हांस कांहीं विचारावेसें वाटतें, " तो चांचपडत म्हणाला. " तसें कशाला ? खरें सांगावयाचें म्हणजे, मला तुम्हाला कांहीं सांगावयाचें आहे. मला प्रथमच भेटलेल्या मनुष्याशीं मी अशारीतीनें बोलण्यास सुरवात करावीं हें हास्यास्पद आहे हें मी जाणतों, परंतु मानसिक दृष्ट्या मी पेचांत आहे असें वाटतें. माझ्या मनाची स्थिति इतकी हळुवार झाली आहे कीं मी जर माझ्या मनांत दडपून ठेवलेली गोष्ट कोणास सांगितली नाहीं तर माझ्या मनाच्या चिंधड्या उडण्याची पाळी येईल.

मी हें असें कां म्हणतों, तें मी आपणांस सर्व हकिकत सांगतांच कळून येईल. अर्थात् त्या परिस्थितींत आपणांस मला कोण-त्याहि तऱ्हेची मदत करतां येणें शक्य नाहीं, हें अगदीं उघड आहे. ”

मी त्याला मध्येंच थांबविलें. असल्या तऱ्हेच्या विचारांनीं त्यानें आपल्या मनाला उगाच त्रास देऊं नये असेंहि मी सुचविलें. एकंदर परिस्थिती काय आहे ह्याची मला मुळींच जाणीव नव्हती, तेव्हां उगाच तर्क करीत बसण्यांत काय अर्थ ? मी पुढें म्हणालों, “ तुमची सर्व हकीकत ऐकल्याशिवाय तुम्हाला मदत करण्याकरितां म्हणून मी अमूक करीन किंवा तमूक करीन अशा वृथा वल्गना करण्यांत तरी स्वारस्य काय आहे ? तरी शक्य ती मदत मी तुम्हाला करीन एवढें आश्वासन देतों. आपल्या मानव बांधवाला दारुण दुःखाच्या गर्तेतून वर निघण्यास मदतीचा हात पुढें करणें हें प्रत्येकाचें आद्यकर्तव्य नाहीं काय ? निदान मदत करण्याचा प्रयत्न करण्यास हरकत नाहीं ना ?

“ काय, काय म्हणालात ? आपल्या मानव बांधवाला दारुण दुःखाच्या गर्तेतून वर येण्यास मदतीचा हात पुढें करणें हें प्रत्येकाचें कर्तव्य आहे. निदान मदत करण्याचा प्रयत्न करणें.....” त्यानें माझीच वाक्यें पुनः अर्थपूर्णदृष्टीनें

म्हटलीं. त्यानें ते माझे शब्द अशा कांहीं तिरस्कारानें, निराशेनें व चमत्कारिक रीतीनें म्हटले कीं मला वाटलें हा एक वेडा तरी असला पाहिजे किंवा यानें बरीच झोंकली असली पाहिजे.

जणूं काय माझ्या मनांत चाललेले विचार त्याला समजून चुकले. पण तो अत्यंत साधेपणानें म्हणाला, " मी कदाचित् विचित्र डोक्याचा माणूस वाटेन किंवा माझ्या ह्या एकलकोंड्या आयुष्याचाहि तो परिणाम असूं शकेल. परंतु त्याच्याशीं आपल्याला कांहींच करावयाचें नाहीं म्हणा. मी तसा अगदीं साफ शुद्धीवर आहे परंतु मला इतके उसळण्यास जर कांहीं कारण असेल तर आपण उच्चारलेला तो " कर्तव्य " हा शब्द होय. तो शब्दोच्चार माझ्या अगदीं अंतःकरणाला जाऊन भिडला व त्यामुळेंच माझें मन असें पुष्कळ वेळां उसळतें. थोडक्यांत म्हणजे मनाला हा "कर्तव्याचा प्रश्न" सारखा त्रास देत आहे.

तो बोलतांना एकदम थांबला व त्यानें स्वतः विषयींची माहिती सांगण्यास खालीप्रमाणें सुरवात केली. " मी एक डॉक्टर आहे, हें तुम्हांस प्रथम सांगितलें पाहिजे. कारण मी तुम्हांस पुढें जी हकीकत सांगणार आहे त्यांतील ती एक मुख्य मुद्याची गोष्ट आहे. आतां डॉक्टरकीच्या धंद्यांत पुष्कळ वेळां अशा केसेस येतात कीं मनुष्य किंकर्तव्यमूढ बनतो. कांहीं लोक त्यांना "फेटल केसेस किंवा बॉर्डर लाइन केसेस" म्हणतात. अशा

त्या केसेसमध्यें डॉक्टरचें कर्तव्य काय आहे हें स्पष्ट कळत नाहीं. इतकेंच काय परंतु वैयक्तिक कर्तव्य, राष्ट्राविषयींचें कर्तव्य व वैद्यकीय शास्त्राविषयींचें कर्तव्य, अशा या त्रिविध कर्तव्याविषयीं त्याच्या मनांत एकच रणकंदन माजतें. आपण म्हणतां त्या-प्रमाणें एखाद्या दारुण दुःखाच्या दरींत अडकलेल्या मानवी प्राण्यास मदतीचा हात द्यावा, हें केव्हांही चांगले आहेच, व माणसानें तसें करावेंहि. कारण एका मनुष्याचा दुसऱ्यास तोच खरा उपयोग होय. तात्विक दृष्टया हे बोल उत्तम आहेत खरे, पण व्यावहारिक दृष्टया त्यांचा किती उपयोग करतां येणें शक्य आहे हा एक मोठा प्रश्न आहे. हेंच पहाना, तुम्हींहि या ठिकाणीं येऊन बसतां व तुम्हाला यापूर्वी मी कधींहि पाहिलें नसतांना मी मात्र तुम्हाला बजावून सांगतो आहे कीं, मी तुम्हाला सांगितलेल्या गोष्टी तुम्ही दुसऱ्या कोणास सांगूं नका. आतां तुम्ही या गोष्टी दुसऱ्यास कां सांगणार नाहीं तर त्या गोष्टी न सांगणें हें आपलें कर्तव्य आहे असें तुम्ही समजतां म्हणून! शिवाय पुन्हां मीच होऊन तुम्हास विनंती करतो कीं, मीं जें तुम्हास सांगणार आहें तें तुम्ही ऐका आणि हें तरी कां तर मी तुम्हास ज्या गोष्टी सांगणार आहे त्या गोष्टीविषयीं मी अजूनहि जर शांत राहिलों तर मलाच कायमचें शांत होण्याचा प्रसंग येईल याची भीति वाटतें म्हणून. त्यांतून पुन्हां तुम्ही ही माझी हकीकत ऐकून घेण्याविषयीं संमति दर्शविलीत. आतां

ही गोष्ट विशेषशीं अवघड नाहीं म्हणा, आणि त्यांत म्हणजे मी तुमच्याजवळ कांहीं विशेष मागतों असेंहि नाहीं. परंतु समजा मी तुम्हास असें म्हणालों असतों कीं मला उचलून एकदम समुद्रांत टाका, तर तें ऐकुन तसल्या कामात मला मदत करणें व अशारीतीनें माझी इच्छा पुरविणें तुम्ही आपलें कर्तव्य समजलां असतां काय ? खात्रीनें नाहीं ! याचा अर्थ असाच ना, कीं कर्तव्यालासुद्धां कांहीं मर्यादाही आहेच. ज्या ठिकाणीं स्वतःच्या आयुष्याचा प्रश्न आहे किंवा अंगिकारिलेल्या सार्वजनिक संस्थेच्या जबाबदारीचा प्रश्न आहे, तेथें तुम्ही म्हणतां त्या कर्तव्याची कांस कोठवर...धरावयाची ? कां आपला डॉक्टर म्हटला कीं त्याच्या कर्तव्याला मर्यादाच नाहीं ? कां त्याच्या जवळ डिप्लोमा किंवा डिग्री असली म्हणजे तो सर्व जगाला मृत्युपासून बचावूं शकतो ? आणि निव्वळ कोणी मला मदत करा असें काकुळतेनें म्हटलें म्हणजे डॉक्टरनें त्याकरतां आपला प्राणहि देण्यास तयार व्हावें ? नाहीं; कर्तव्यालाहि कांहीं सीमा आहेच."

जरा वेळ थांबून त्यानें पुन्हां बोलण्यास सुरवात केली. " माझें मन इतकें व्यग्र व त्रस्त झालें आहे याबद्दल मला खरोखरच फार वाईट वाटते. मी हें दारुच्या धुंदींत बोलतों आहे असें समजूं नका. छे, तसें मुळींच नाहीं. पुष्कळ वेळेला

गत आयुष्याच्या दुःखकारक आठवणी विसराव्या म्हणून मी दारू पितो, नाहीं असें नाहीं. या पूर्वेकडील प्रदेशांत मी अगदीं एकटा राहात असल्यामुळें माझ्या मनाचा तो एक्कलकोंडेपणा मला ही दारू घ्यावयास लावी. तुम्हीच कल्पना करा मी तेथें या नेटिवांच्या व इतर प्राण्यांच्या संगतींत सात वर्षे एकटा राहात आहे आणि अशा ह्या परिस्थितींत शहाणपणानें व गांभिर्यानें कसें बोलावें हें मनुष्य सहजच विसरतो, आणि जेव्हां त्याला स्वबांधवाशीं बोलण्याची संधि मिळते, तेव्हां तो हा असाच वाहवत जातो. हो, पुढें काय बरें म्हणत होतों मी ? हो खरेंच, मी तुम्हाला असा प्रश्न विचारणार होतों कीं, मनुष्यानें मग तो कोणत्या कां परिस्थितींत असेना दुसऱ्यास मदत केलीच पाहिजे कां ? परंतु मला वाटतें माझें हें गुऱ्हाळ फारच लांबत चाललें. तुम्हाला माझ्या या बडबडीचा कंटाळा तर आला नाहीं ना ? "

" हे भलतेंच कांहीं तरी " ! मी म्हणालों. त्या अंधारांत तो कांहींतरी चांचपडत आहे असें मला वाटलें. त्याच्याजवळ दोन बाटल्यांच्या आकारासारखे कांहींसे दिसलें. त्यानें त्यांतील दारू एका ग्लासमध्यें ओतली व तो ग्लास माझ्या हातांत देऊन म्हणाला " काय, तुम्हाला ड्रिंक नको काय ? " मी त्याच्याबरोबर थोडीशी दारू घ्यावी म्हणून एक घोट घेतला

व त्यानें मात्र बरीच दारू घेतली. नंतर एक क्षणभरच सर्वत्र शांत होते. इतक्यांत बोटीवर साडेबारा बाजल्याची घंटा झाली.

× × × × ×

" असो, मी तुम्हाला एका केससंबंधीं हकीकत सांगणार आहे. समजा एका गांवांत वैद्यकीचा धंदा करणारा एक डॉक्टर आहे. "

तो गृहस्थ पुन्हां थांबला. हकीकत सांगावी कां नाहीं, अशा प्रकारची मनाची चलबिचल त्याच्या चेहेऱ्यावर थोडा वेळ दिसून येत होती. नंतर जरा वेळानें त्यानें पुन्हां सांगण्यास सुरवात केली.

" छे, तें कांहीं नाहीं. गोष्टी जशा घडल्या, तशाच्या तशाच मला त्या तुम्हाला सांगितल्याच पाहिजेत. अगदीं स्पष्ट-पणें सर्व गोष्टी सांगितल्याशिवाय त्या तुम्हाला समजणार नाहींत कांहींही लपवाछपवी करतां कामा नये. ज्याप्रमाणें एकादा रोगी एखाद्या डॉक्टरकडे आला म्हणजे त्याला इत्थंभूत सर्व हकीकत सांगावी लागते, कांहींही लपवून ठेवतां येणें शक्य नसते किंवा शक्य असले तरी तें इष्ट नाहीं, तसेंच त्या रोग्यानें जर कांहींच्या कांहींच खोटी हकीकत सांगितली तर तें जसें त्याला

हितावह होत नाहीं, त्याप्रमाणेंच मला तुम्हाला सर्व तरी हकीकत सांगितल्याशिवाय माझें मन हलकें व्हावयाचें नाहीं. म्हणून वर उल्लेख केलेल्या रोग्याप्रमाणेंच मी तुम्हास सर्व हकीकत जशीच्यातशीच सांगतो. त्या भयाण अशा एकांतवासांत दिवस कंठावे लागल्यामुळें माझ्यांतील शिष्टाचार वगैरे गोष्टी केव्हांच नाहींशा झाल्या आहेत असें म्हणावयास हरकत नाहीं. इतकेंच काय पण त्या परक्या प्रान्तांत मला एकटें रहावें लागल्यामुळें माझ्या अंतःकरणांतील ओलावा व मनाचा ममताळुपणाहि सर्व आटून गेला आहे कीं काय ह्याची मला शंका आल्याशिवाय राहात नाहीं.

तो मूळ हकीकत सांगावयाची बाजूला ठेवून दुसरेंच कांहींतरी सांगत सुटला असल्यामुळें मी जरासें तोंड खट्टूच केलें होतें. त्याला तें दिसलें असावेंसें वाटतें. कारण तो म्हणालाः—

“ हो, हो, तुम्हांला हिंदुस्थान वगैरे पूर्वेकडील देश फार आवडतात असें दिसतें. तेथील तीं सुंदर व भव्य देवालयें, गगनचुंबी व सरळ असें नारळ व पोफळीचें वृक्ष व तें पीठासारखें शुभ्र स्वच्छ चांदणें वगैरे गोष्टी तुम्हाला मोठ्या चित्ताकर्षक व चमत्कृतिजन्य वाटत असतील नाहीं ! साहाजिकच आहे ! कारण तुम्ही काय बोलूनचालून देश पाहाण्याकरितांच हा एकदोन महिन्यांचा प्रवास करीत आहांत.

रेल्वेनें, मोटारमध्यें किंवा रिक्शामध्यें प्रवास करणाऱ्या इसमांस हे उष्ण कटीबंधांतले प्रांत खरोखरीच मोठे मनोहारी वाटतात. मी जेव्हां सात वर्षांमागें प्रथम इकडे आलें, तेव्हां मलाही प्रथम तसेंच वाटलें. त्यावेळीं मी काय काय करावें व व मला काय काय करतां येईल याविषयीं मला फार चांगली चांगलीं सुखस्वप्नें पडत होतीं. एकदां वाटे आपण या येथील लोकांची भाषा शिकावी व त्यांच्या धार्मिक ग्रंथांचें मूळ भाषेंत परिशीलन करावें, उष्णकटिबंधांतील रोगांचा अभ्यास करून कांहीतरी वैद्यकीय शास्त्राच्या शोधांत भर टाकावी, येथील रानटी लोकांच्या ( कारण यूरोपियन लोक इकडील बहुतेक लोकांना रानटीच समजतात. ) मनःस्थितीचें सूक्ष्म अवलोकन व अभ्यास करून त्यांना संस्कृति व सुधारणा म्हणजे काय हें सांगणारा मिशनरी व्हावें······अशा कित्येक तरी गोष्टी प्रथमतः माझ्या डोक्यांत घोळत होत्या··················

परंतु या उष्णकटिबंधांतील प्रान्तांत आयुष्य घालविणें म्हणजे अदृश्य भीतीनी वेष्टिलेल्या एखाद्या उष्णतेनें तप्त झालेल्या अशा छिद्रांत किंवा गुहेंत वास्तव्य केल्यासारखें होय. त्यांचा परिणाम म्हणजे मनुष्याची महत्वाकांक्षा, त्याचा हुरुप हीं सर्व लयास जातात. तुम्ही कोयनेलचे पळा एवढाले डोस घेतले तरी ताप म्हणून हटावयाचा नाहीं आणि हा ताप एकदां को

पाठीमागें लागला कीं, तो तुमच्यांत असेल नसेल तेवढी सर्व शक्ति खेंचून व पिळवटून बाहेर काढतो व तुम्हाला निस्तेज, आळशी व पंगु बनवतो. त्यांतल्यात्यांत युरोपियन मनुष्याला एकाद्या शहरांतून उचलून लांब असलेल्या वसाहतीच्या प्रदेशांत नेऊन टाकला कीं, तो आपल्या पूर्व स्वभावाला, विचारांना अंतरतो व मग त्याचे हाल कांहीं विचारूं नका. त्याच्या मनाचा खंबीरपणा व समतोलपणा गेलाच म्हणून समजावें. मग काय, कांहीं दारू पिऊं लागतात, कांहींना अफूची संवय लागते, कांहीं निव्वळ पशू बनतात. मग ते काय करतील व काय न करतील ह्याचा मुळींच नेम नाहीं. मग त्यांना युरोपची आठवण होते. दोन्हीं बाजूला पद्धतशीर इमारती असलेल्या रस्त्यावरून चालण्याची ती युरोपमधील मजा कोणीकडे ! कांचेचीं तावदानें असलेल्या खिडक्यांनीं शोभिवंत अशा दिवाणखान्यांत गौरवर्ण स्त्रीपुरुषांशीं गप्पागोष्टी करीत बसण्यापासून मिळणारा तो आनंद कोणीकडे ! वर्षानुवर्षे डोक्यांत हे असलेच विचार चालतात आणि युरोपला परत जाण्याकरितां त्याला रजा मिळते. परंतु तोपर्यंतच्या कालांत तो इतका आळशी व लड्ड बनतो कीं, त्याला ती मिळणारी फर्लो रजासुद्धां नकोशी वाटते. हो, कारण आतां युरोपमध्यें जाण्यापासून तरी काय फायदा आहे ! आणि त्यांतून तो घरीं गेलाच तर त्याचें आगतस्वागत

होण्याऐवजीं लोक त्याला टाळूच पहाणार; मग तिकडे जा तरी कशाला, असा विचार करून तो इथल्याच या जंगलमय उष्ण प्रदेशांत राहाण्याचें ठरवितों. खरोखर या विषुववृत्तावरील तापदायक प्रांतांत मी ज्या दिवशीं नौकरी पत्करली तो माझ्या आयुष्यांतील सर्वांत वाईट दिवस होय.

बाकी तसें म्हटलें तर मी माझी फर्लो रजा स्वखुषीनें सोडून दिली, असेंच सर्वस्वी म्हणतां येणार नाहीं. मी जर्मनी-मध्यें वैद्यकीचा अभ्यास केला. माझा जन्महि जर्मनींतीलच आहे. माझा अभ्यासक्रम पूर्ण झाल्यावर मला लाइप्झीक येथील रुग्णालयांत नौकरी मिळाली. त्यावेळची वैद्यकीय मासिकें जर आपण चाळलींत तर मी त्या लहान वयांतसुद्धां कांहीं कांहीं रोगांची निदानें, पथ्यें व उपचार किती चांगल्या रीतीनें करीत असे याची आपणांस प्रचिती येईल.

परंतु त्यानंतर मी ज्या एका प्रेम संबंधांत अडकलों गेलों त्यामुळें माझ्या आयुष्यांतील मी एक चांगली संधी गमावून बसलों. रुग्णालयांतील एका स्त्रीशीं माझी ओळख झाली. ती स्त्री ज्या पुरुषाबरोबर राहात असे त्याला तिचें इतकें वेड लागलें कीं तो खरोखरच वेडा बनला आणि त्या भरांत त्यानें स्वतःवर गोळी झाडून घेण्याचा प्रयत्न केला. माझीही जवळजवळ तशीच

स्थिती झाली होती. कधीही न जिंकतां येणारी एक प्रकारची ऐट तिच्या वागणुकींत दिसली. दुसऱ्यावर हुकमत चालविणाऱ्या व जराशा बेमुर्वखोर स्त्रियांच्या तावडींत मी सांपडलों कीं संपलेंच म्हणावयाचें. या बाईनें तर काय मला आपलें बाहुलेंच बनविलें. ती जें जें म्हणेल तें तें मी करीत आलों, शेवटीं तर मी तिच्या इतका आहारीं गेलों कीं, बाकीं त्या गोष्टीला आतां आठ- वर्षे होऊन गेली म्हणा······तिच्याकरितां मी रुग्णालयांतील सेफमधील पैसेही चोरले. अर्थातच ही गोष्ट उघडकीस आली. माझ्या एका चुलत्यानें ते पैसे भरले. परंतु लाइप्झीकमधील एकंदर जीवनक्रम संपला व नोकरीस रामराम ठोकावा लागला.

याच सुमारास मी असें ऐकलें कीं डच गव्हर्नमेंटला त्यांच्या वसाहतीकरितां एका डॉक्टरची जरुरी असून त्याला ते बऱ्यापैकीं पगारही देण्यास तयार आहेत. प्रथमतः मला असें वाटलें कीं, यांत कांहींतरी डाव असला पाहिजे. कारण या उष्णकटिबंधांतल्या प्रदेशांत भाजीपाल्याइतकी थडगीही जोमानें वाढतात. परंतु जोपर्यंत मनुष्य तरुण असतो तोपर्यंत त्याला असें वाटत असतें कीं, ताप व मृत्यु यांची फेरी आपणां- कडे वळणार नाहीं म्हणून!

खरें सांगावयाचें म्हणजे मला आतां दुसरी गतच उरली नव्हती आणि म्हणूनच मी रॉटरडॅमला गेलो व दहा वर्षांच्या

करार लिहून दिला, आणि नोटांचे एक पुडके घेऊन आलों. त्यांतील अर्धे पैसे मी माझ्या चुलत्याला पाठविले आणि बाकी राहिलेले निम्मे पैसे आतांच वर्णन केलेल्या नमुन्याची दुसरी एक मुलगी भेटली तिच्या नादीं लागून घालविले. अशारीतीनें नोकरी करतां विसार म्हणून मिळालेल्या पैशांची विल्हेवाट लाविली. शेवटीं बिनपैशानिशी, घड्याळाशिवाय व सुन्न मनानें मी यूरोप सोडलें आणि ज्याप्रमाणें तुम्ही डेकवर येऊन बसतां त्याचप्रमाणें मीही त्यावेळीं येऊन बसत असे; आणि कधींकधीं या पूर्व प्रांतांतील पोफळी, नारळीची झाडें, निरभ्र आकाश व एकांतांतल्या शांततेंत रचलेले मनाचे मनोरे यापासूनही मिळणारा आनंद उपभोगीत असे.

परंतु कांहीं दिवसांनीं मला माझ्या या एकांताचा वीट आला. डच गव्हर्नमेंटनें मला ज्या ठिकाणीं लोकांची दाट वस्ती आहे, खेळण्याचे क्लब्ज् आहेत. व गोरे लोक भेटण्याचा संभव आहे अशा बटाव्हिया किंवा सुरबय्या वगैरे मोठ्या शहरीं पाठविलें नाहीं, तर त्यांनीं मला ज्या ठिकाणीं पाठविलें तें ठिकाण......पण जाऊ द्या त्याच्या नांवाशीं आपणांस कांहींच कर्तव्य नाहीं. शहरापासून एका दिवसाच्या अंतरावर असलेलें तें ठिकाण......त्या ठिकाणीं परमेश्वराचें तरी वास्तव्य होतें किंवा नाहीं हें त्या परमेश्वरासच माहीत ! त्या ठिकाणचा उष्ण

सुशिक्षित समाज म्हटला म्हणजे दोन किंवा तीन मंद डोक्याचे व उन्हानें काळवंडलेल्या चेहऱ्याचे ऑफिसर्स आणि एकदोन मिश्र जातीचे लोक, हा होय. बाकीची सर्व वसाहत म्हणजे घनदाट जंगली अरण्यें, शेतें व दलदलीच्या जागा यांनीं व्यापलेला मुलुख होय.

तरीसुद्धां प्रथम प्रथम मला विशेषसा कंटाळा आला नाहीं. कारण त्यांत नावीन्याची मौज होती. कांहीं काळपर्यंत मी माझ्या दिवसाचा बराचसा भाग अभ्यासांत घालवीत असे. तेथील व्हाइसरेसिडेंट एकदां एका प्रांतांतून तपासणी करीत हिंडत असतां त्याच्या मोटारीस अपघात झाला. त्यामध्यें त्याच्या पायाचें हाड मोडलें. मजशिवाय तेथें दुसरा कोणी डॉक्टर नसल्यामुळें अर्थातच ऑपरेशन वगैरे विधी मलाच करावे लागले. ऑपरेशन यशस्वी होऊन ते गृहस्थ बरे झाले आणि चांगले श्रीमंत असल्यामुळें मला मोबदलाही बरा मिळाला. त्यानंतर कांहीं दिवस मी मानवशास्त्राचा अभ्यास केला व पूर्वीच्या लोकांची औषधांची पद्धत, त्यांची राहणी, त्यांची युद्धसामुग्री वगैरेची माहिती करून घेतली. अशारीतीनें रोजरोज कांहींतरी नवीन गोष्टी काढून मी माझी करमणूक करून घेत असे.

परंतु युरोपमधून बरोबर आणलेला उत्साह व उमेद असेपर्यंत या गोष्टी टिकल्या. नंतर येथील उष्ण हवेचा परिणाम

हळुहळूं दिसूं लागला. वसाहतींतील इतर गोऱ्या लोकांनीं तर मला सतावूनच सोडलें. शेवटीं मी त्यांचा सहवास टाळूं लागलो व दारू पिऊन माझ्याच कंटाळवाण्या विचारांत मग्न होऊं लागलो. कसेंतरी करून आणखी दोन वर्षे टिकाव धरून राहाणें भागच होते. त्यानंतर पेन्शन घेऊन युरोपांत आपल्या जीवनक्रमास पुन्हां नव्यानें सुरवात करावी असें मी ठरविलें. अर्थातच तो काळ येईपर्यंत वाट पहात बसण्यापलीकडे दुसरें गत्यंतरच नव्हतें. आणि सध्यां या घटकेला मी तेथेंच वाट पाहात असलेला आढळावयाचा, परंतु अनपेक्षित घडलेली जी गोष्ट मी आतां तुम्हास सांगणार आहे तीमुळें सर्वच गाडें बदललें.

\+ + + +

अंधारांत तो आवाज मिसळून गेला. रात्रीची शांतता इतकी पूर्ण होती कीं, जहाजांतील यंत्राचा आवाज व उसळणाऱ्या लाटांचा ध्वनि यांची चाललेली स्पर्धा स्पष्टपणें ऐकूं येत होती. मी सिगारेट शिलगावण्याच्या अगदीं बेतात होतो, परंतु एकदम होणाऱ्या हालचालीमुळें आत्मनिवेदन करणारा तो गृहस्थ बिचकेल अशी मला भीति वाटली.

कांहीं कालपर्यंत शांततेचा भंग कोणीही केला नाहीं. आपण आपल्या जीवनाचा वृत्तान्त अशारीतीनें सांगणें

अप्रयोजक आहे, असें तर त्याला वाटलें नसेल ना ? का पुनरपि तो आपल्या गुंगींत मग्न झाला ?

अशा रीतीनें विचार माझ्या डोक्यांत येतात तोंच एक वाजल्याचा ठोका पडला. तो गृहस्थ थोडासा हालला व त्यानें व्हिस्कीची बाटली जवळ ओढली, त्याचा आवाज मला ऐकूं आला. अंगांत थोडी हुषारी उत्पन्न करून तो बोलूं लागला. " असो अशा रीतीनें मी माझा काळ कंठीत होतों. महिनेच्या महिने ज्याप्रमाणें एकादा कोळी आपल्या जाळ्यांत मध्यभागीं रिकामटेकडा बसून काळ घालवितो त्याचप्रमाणें मीही ह्या निर्जन प्रदेशांत दिवस कंठीत होतों. लवकरच पावसाळा संपला. कांहीं आठवडेपर्यंत मुसळधार पडणाऱ्या पावसाच्या कटकटीनें माझे कान अगदीं विटून गेले होते. आणि कांहीं दिवसपर्यंत मला कोणाही युरोपियन मनुष्याचें दर्शन घडलें नाहीं. माझ्या घरांत मी अगदीं एकटा बसलेला असें. नाहीं म्हणावयास माझा नेटिव्ह नोकर व माझी व्हिस्कीची बाटली येवढेंच काय ते माझे सांगाती. एकाद्या कादंबरींत युरोपांतील सुंदर स्त्रियांचें वर्णन वाचलें कीं, माझें शरीर थरारत असे, व घरची आठवण ज्यास्त तीव्रतेनें होई. तुम्ही काय नुसतेंच जगांतील प्रवासी म्हणून घराबाहेर पडला आहां. अर्थातच एकाद्या परक्या प्रांतांत कांहीं दिवस वास्तव्य करून राहिलेल्या इसमाचे अनुभव तुम्हास कोठून मिळणार ? या उष्ण हवेच्या प्रदेशांत

आपल्यासारख्या युरोपियन मनुष्यास कांहीं वेळां इतकें निःसत्व व पंगू वाटतें कीं, वेड लागण्याची पाळी येते. एक दिवस मी असाच आपण कोणकोणत्या प्रांतांत प्रवास करावा यासाठीं जगाचा नकाशा पुढें ठेवून विचार करीत बसलों होतों. इतक्यांत आश्चर्यानें आ पसरून माझे दोन नोकर एकदम माझ्या खोलींत आले व एक युरोपियन स्त्री माझी भेट घेऊं इच्छिते असा त्यांनीं पुकारा केला.

मला सुद्धां आश्चर्यच वाटलें. कारण गाडीचा किंवा मोटा-रचा आवाज मी ऐकला नाहीं. आणि अशा या निर्जन प्रदेशांत ती युरोपियन स्त्री आली कोठून आणि कशाला ?

माझ्या घराच्या दुसऱ्या मजल्यावरच्या व्हरांड्यांत मी बसलों होतों, त्या वेळीं कोणी माझी भेट घेण्यास येईल अशी कल्पना नसल्यामुळें माझा तो साधा पोषाख मी साफसूफ करून थोड्याशा धिटाईनें ही स्त्री आहे तरी कोण हें पाहण्याकरितां खालीं आलों खरा, परंतु माझें मन अगदींच अस्थिर व भित्रें बनलें होतें. माझा या प्रदेशांत एकहि मित्र नसताना ही गोरी स्त्री मला भेटावयास कां यावी बरें ?

घराच्या खालच्या मजल्यावरील एका खोलींत ती बसली असून तिचा नोकर, [illegible] चिनी मुलगा तिजजवळ उभा होता.

मला नमस्कार करण्याकरितां ती उठून उभी राहिली तेव्हां तिच्या तोंडावर असलेला पातळ बुरखा मला दिसला. मी एक शब्दही बोलण्याच्या अगोदर, "Good morning, Doctor" ती इंग्रेजींत म्हणाली. " मी आपणांस न कळवितां एकदम आपल्या भेटीस आलें याजबद्दल क्षमा करा " जराशा धांदलीनें व एकाद्या नटानें पाठ केलेल्या संभाषणाप्रमाणें ती बोलत होती. " आम्ही या वसाहतींतून चाललों असतां आम्हाला थोडा वेळ मोटर थांबविणें भाग पडलें. आणि तुम्ही येथें राहतां याची मला आठवण झाली." तिच्या या शब्दांनीं मी जास्तच बुचकळ्यांत पडलों. ती जर मोटारमधून चालली होती तर माझे घरापर्यंत तिला मोटारींत यावयास काय झालें होतें ? " डॉक्टर " ती पुढें म्हणाली " तुमच्याविषयीं मी बरेंच ऐकलें आहे. व्हाइस रेसिडेंट साहेबांना तुम्हीच बरें केलें व त्यांचा मोडलेला पाय पूर्ववत् बरा झाला आहे. कारण त्यानंतर पूर्वीप्रमाणेंच त्यांना गोल्फ खेळतांनाही मी प्रत्यक्ष पाहिलें. ही जी असामान्य गोष्ट आपण केली त्यामुळें आपलें नांव सर्वतोमुखीं झालें असून आमचे ते पूर्वीचे चढेल सर्जन साहेब, आणि त्यांचे बेमुर्वतखोर व उर्मट मदतनीस दोन डॉक्टर यांना सोडून शस्त्रक्रिया व औषधोपचार यांच्याकरितां आपणांकडे यावें असें प्रत्येकास वाटूं लागलें आहे. आणि खरेंच मी विचारतें, डॉक्टर, तुम्ही हेड क्वार्टर्सकडे कधींच कसे येत नाहीं ? तुम्हाला

एकाद्या योग्याप्रमाणें येथें एकलकोंडें आयुष्य घालविण्यांत आनंद तरी कसा वाटतो ?"

अशा रीतीनें तिच्या जिभेची टकळी सारखी चालली होती. तिच्या त्या बडबडण्यानें मी तर नरव्हस् झालों. ती अशी बडबड तरी कां करीत होती, याचेंच मला आश्चर्य वाटत होतें. बरें, या सर्व गोष्टी मला सांगण्याचें प्रयोजन तरी काय ? आणि तिनें आपल्या तोंडावरचा बुरखा तरी काय म्हणून अजूनपर्यंत काढला नाहीं ? तिला ताप आला होता कां ती वेडी होती ? असले विचार माझ्या डोक्यांत येऊं लागले. प्रथमतः तर मी इतका गोंधळून गेलों कीं, काय करावें व काय बोलावें हें मला सुचेना. शेवटीं मी तिला वरती येण्याविषयीं विनंती केली. तिनें त्या चिनी मुलास तेथेंच राहण्याकरतां खूण केली व ती जिन्याकडे वळली.

" फारच सुंदर घर आहे, " माझ्या बसावयाच्या खोलींत एकवार दृष्टी टाकून ती उद्गारली, " किती उत्तम पुस्तकें आहेत हीं ? मला जर हीं सर्व पुस्तकें वाचतां येतीं तर ! " ती पुस्तकांच्या शेल्फजवळ जात व पुस्तकांचीं नांवें वाचीत म्हणाली.

" आपण थोडा चहा घेता कां ? " मी चौकशी केली. तिनें पाठीमागें न वळतांच उत्तर दिलें, " No, thank you Doctor, मला तसा फारसा वेळहि नाहीं म्हणा. अरे वा !

हें काय ? फ्लाउबेर्टचें “ Education Sentimental का ? फारच छान पुस्तक आहे. तुम्हाला फ्रेंचसुद्धां येतें वाटतें ? तुम्ही जर्मन लोक म्हणजे मोठे हुषार ! बाकी तुमच्या जर्मनींतील शाळांतून सुद्धां किती तरी भाषा शिकवितात. तुमच्यासारखें मला जर जर्मन बोलतां येतें तर किती छान झालें असतें ? व्हाइस रेसिडेंट साहेब म्हणे म्हणत होते कीं, तुम्हाला म्हणूनच त्यांनीं शस्त्रक्रिया करतांना सुरी वापरण्याची परवानगी दिली. आमचे ते जे सीनिअर सर्जनसाहेब आहेत, ते म्हणजे नुसतेच ब्रिज खेळण्याच्या लायकीचे, असेहि त्यांनीं उद्गार काढले म्हणतात. हो, पण माझ्या मनांतून तुमची कांहीं बाबतींत सल्ला घ्यावी असें होतें व मी सहज या बाजूनें जात असल्यामुळें ती संधी दवडूं नये असें मला वाटलें. ”

हें सर्व बोलत असतांना तिनें चुकून सुद्धां मजकडे पाहिलें नाहीं. कारण, हा सर्व वेळ तिनें आपली दृष्टि पुस्तकांकडे लावली होती. ती पुढें म्हणाली, “ मला वाटतें, तुम्ही फार कामांत आहांत, मग मी पुन्हां केव्हां तरी येऊं कां ? ”

मला तिच्या या बोलण्याचा चमत्कार वाटला. परंतु, तसें कांहींच न दाखवितां मी तिला म्हणालों, “ तुम्हांस आतां, किंवा यापुढें केव्हांहि माझ्या मदतीची जरुरी लागली तर ती मी करण्यास तयार आहे. ”

ती माझ्याकडे वळली परंतु माझ्याकडे धीटपणानें मात्र तिनें अजून पाहिलें नाहीं. शेल्फवरून घेतलेल्या एका पुस्तकाचीं पानें चाळीत ती म्हणाली, " बाकी अनायासेंच मी येथें आलें आहे, तसें कांहीं मोठें सीरियस नाहीं म्हणा. स्त्रियांच्या नेहमींच्याच कुरकुरी. मलूलता, ओकारी, फिट्स येणें वगैरे. आजच सकाळीं, माझी मोटार एका कोंपऱ्यावरून वळत असतांना मी त्या धक्क्यानें एकदम बेशुद्ध झालें, आणि या माझ्या पोऱ्यानें वेळींच जर मला सांवरलें नसतें तर मी रस्त्यावर पडलें असतें. त्यानें माझ्याकरितां थोडें पाणी आणलें आणि मग मला जरा बरें वाटलें. मला वाटतें माझ्या शोफरनें गाडी फारच फास्ट हांकली असली पाहिजे. "

" तसें एकदम कांहीं सांगतां येणार नाहीं म्हणा ! बरें पण, अशा फिट्स तुम्हांला पूर्वीं कधीं आल्या होत्या काय ? " मी म्हणालों.

" छे हो, हें नुकतेंच सुरू झालें आहे. अगदीं अलिकडे या दोनतीन आठवड्यांत, आणि विशेषतः सकाळीं तर मला अगदींच अशक्त व निःसत्व वाटतें. " ती पुढें म्हणाली.

ती पुन्हा बुकशेल्फजवळ गेली. दुसरें एक पुस्तक तिनें हातांत घेऊन पानें चाळावयास सुरवात केली. ती असें कां बरें

करीत होती, मला कांहींच समजेना. तोंडावरचा बुरखा तिनें कां बरें काढला नाहीं. ? माझ्याकडे तिनें कां बरें पाहिलें नाहीं ? मी कांहीं वेळ मुद्दामच उत्तर दिलें नाहीं. तिला तशीच थांबवून धरावी यांतच मला एक प्रकारचा आनंद वाटूं लागला. ती जर अशी चमत्कारिक वागत होती तर मला तरी काय हरकत आहे ? शेवटीं ती पुन्हां पूर्वींप्रमाणें अडखळत व थांबून थांबून बोलूं लागली. " काय डॉक्टर, मग मी म्हणालें तसेंच ना ? यांत भिण्याचें कांहीं कारण नाहीं ना ? ऊष्णकटिबंधांतल्या एकाद्या भयंकर रोगांपैकीं तर हा रोग नाहीं ना ? " तिनें पुन्हा विचारलें.

"तुमचे अंगांत ताप आहे काय हें मला नाडी तपासून पाहिलें पाहिजे " असें म्हणून मी तिजजवळ गेलों परंतु ती दूर सरली. " छे, डॉक्टर, मला ताप नाहीं ह्याबद्दल माझी खात्री आहे. कारण मला या अशा फिट्स् येऊं लागल्यापासून बहुतेक दररोज मी माझें टेंपरेचर घेत असते, आणि तें तर कधींच नॉर्मलावर गेलें नाहीं. बरें अपचनाची कधीं तक्रार नाहीं. " तिनें स्पष्टीकरण केलें.

मी बुचकळ्यांत पडलों. भेटीस आलेल्या त्या स्त्रीच्या चमत्कारिक वागण्यानें माझ्या मनांत शंकाकुशंका येऊं लागल्या. तिला मजजवळून कांहींतरी पाहिजे आहे हें स्पष्ट

दिसत होतें. असल्या या निर्जन प्रदेशांतून उगीच कांहींतरी फ्लाउबेर्टच्या पुस्तकावर केवळ चर्चा करण्याकरितां लांबचा प्रवास करून कांहीं ती आली नसावी. एकदोन मिनिटें थांबून मी तिला म्हणालों, " क्षमा करा, पण मी तुम्हास स्पष्टपणें कांहीं प्रश्न विचारिले तर चालतील ना ? "

" हो, हो, कांहीं हरकत नाहीं. नाहींतर डॉक्टरकडे यावयाचें कशाला ? " ती सहज म्हणाली, परंतु तिनें पुन्हां पाठ वळवली व पुस्तकांशीं तिचा चाळा पुन्हा सुरु झाला.

" तुम्हास मूलबाळ कांहीं आहे कां ? " मी विचारिलें.

" होय, एक मुलगा आहे " ती म्हणाली.

" बरें, पण तुम्हाला आतां जीं लक्षणें होतात, तीच लक्षणें तुम्हाला पूर्वी तुमच्या गर्भारपणच्या पहिल्या तीनचार महिन्यांत होत होतीं काय ? " मी म्हणालों.

" होय, " तिनें उत्तर दिलें.

तिचें तें उत्तर अत्यंत निर्णयात्मक व चोख होतें. मी पुढें म्हणालों " मग आतांहि तुम्हाला ज्या अर्थी तशाच भावना होत आहेत, त्या अर्थी तुमची परिस्थिती पूर्वीप्रमाणेंच असण्याचा संभव आहे. "

" होय, " ती उद्‌गारली.

पुन्हां तसेंच चोख व तीक्ष्ण उत्तर.

" तर मग तुम्ही माझ्या कन्सल्टींग रूममध्यें चलावें हें बरें. तेथें तुम्हास तपासल्यावर या प्रश्नाचा एका क्षणांत निकाल लागेल. " मी सांगितलें.

सरते शेवटीं ती मजकडे वळली व तिचे पाणीदार डोळे माझें अंतःकरण भेदून जात आहेत असें मला वाटलें.

" नाहीं, डॉक्टर, त्याची कांहीं जरूरी नाहीं. माझ्या एकंदर परिस्थितीविषयीं मला मुळींच शंका नाहीं;" ती म्हणाली.

× × × × ×

नंतर थोडा वेळ अगदीं शांतता होती. त्या आत्मनिवेदन करणाऱ्या गृहस्थानें आपल्या आवडत्या चेतनावर्धक पेयाचा एक घोट घेतला व तो हकीकत पुढें सांगू लागला.

" ह्या सर्व गोष्टींचा तुम्हीच स्वतःशीं विचार करा. मी तसल्या त्या एकांतवासांत खितपत पडलों होतों. तशांत कोठूनशी एक स्त्री मजकडे आली. बऱ्याच वर्षांत मी युरोपियन स्त्री अशी ही पहिल्यान्दाच पाहिली. मला वाटलें, कांहीं तरी मोठें संकटच माझ्या खोलीमध्यें उभें आहे कीं काय ? तिच्या त्या दृढनिश्चयापुढें मी तर अगदींच दिग्मूढ झालों. ती

कांहीं तरी उगाच गप्पा मारण्याकरितां आली असें प्रथम दिसलें खरें, परंतु एकाद्याचे अंगावर सुरी मारून फेंकावी त्याप्रमाणें तिची मागणी मला वाटली. कारण तिला काय पाहिजे होते हें अगदीं स्पष्ट होतें. अशा प्रकारची विनंती करण्याकरितां स्त्रिया कांहीं माझ्याकडे आज प्रथमच आल्या होत्या असें नाहीं, परंतु त्या सर्व डोळयांत आंसवें आणून आम्हाला या संकटांतून कसें तरी करून सोडवा अशी नम्र याचना करीत आल्या होत्या. परंतु ही पहावी तों एक असामान्य दृढनिश्चयी, स्त्री दिसली. प्रथमपासूनच मला असें वाटूं लागलें कीं, हिच्या मनाची खंबीरता माझ्यापेक्षां जास्त जोरदार असून ती मला तिच्या मनाप्रमाणें बहुतेक गोष्टी करावयास लावणार म्हणून. माझ्या मनांत त्यामुळें तिच्या विषयीं एक प्रकारचा तिटकारा वाटूं लागला व ती माझा एक शत्रू आहे अशी माझी भावना होऊं लागली.

कांहीं काळपर्यंत माझ्या ह्या हेकेखोरपणांत मी स्तब्धच राहिलों. ती आपल्या पातळ बुरख्यांतून माझ्याकडे रोखून पाहात असून मला बोलावयास भाग पाडीत आहे, असें मला वाटलें. पण तसें करण्यासहि मी तयार नव्हतों. मी जेव्हां तिला उत्तर दिलें, तेव्हां सर्व गोष्टी स्पष्टपणें सांगण्यास भाग पाडण्याचा मी प्रयत्न केला. माझ्या मनांतून इतरांप्रमाणें तिनें माझी मनधरणी करावी असें होतें. आणि मला हें माहित होतें कीं,

तिच्या त्या करारी उद्धटपणापुढें मी टिकलों नसतों, आणि म्हणूनच माझे मनांतून तिनें मजजवळ विनंतीवजा बोलणें करावें, असें होतें.

अर्थातच कांहीं वेळ इकडल्या तिकडल्या विषयांवर बोलून तिला होणाऱ्या भावना अगदींच साध्या असून स्त्रियांना गर्भार-पणच्या पहिल्या दोनचार महिन्यांत अशा प्रकारच्या फिटस् साधारणपणें येतात, आणि असें होणें हें भयसूचकतेचें व अनर्थाचें लक्षण नसून उलट सर्व गोष्टी चांगल्या तऱ्हेनें पार पडणार याचें एक द्योतक आहे. अशा तऱ्हेच्या केससंबंधीं मी जें कांहीं पाहिलें आणि वाचलें त्यासंबंधीं माहिती सांगून ही सर्वच गोष्ट क्षुल्लक आहे अशा रीतीनें मी बोलूं लागलों. मी सारखा बोलतच राहिलों, कारण ती मला मध्येंच थांबवील अशी माझी अपेक्षा होती, व त्याप्रमाणें जणुं काय हाताच्या फटकाऱ्यानें ती मी बोललेले शब्द पुसून टाकीत आहे अशा रीतीनें हात हालवून तिनें मला बोलतांना थांबाविलें, व ती म्हणाली, " डॉक्टर मला जो त्रास होत आहे तो हा नाहीं. पूर्वीप्रमाणें मला बरें वाटत नाहीं. माझ्या अंतःकरणांत खऱ्या यातना होत आहेत. "

" काय अंतःकरणांत म्हणालांत ? " मला खरोखरच तिजबद्दल काळजी वाटते, असा बहाणा करून मी उद्गारलों.

"बरं तर मग, मला तुमची छाती तपासूं द्या" स्टेथास्कोप काढतांना मी म्हणालों.

पुन्हां एकदां ती मागें सरली, व ड्रील घेणाऱ्या एकाद्या सार्जंटप्रमाणें हुकमी आवाजांत म्हणाली, "डॉक्टर, हें हार्ट-ट्रबलच आहे, या माझ्या सांगण्यावर तुम्ही विश्वास ठेवा, उगीचच तपासणी करण्यांत तुमचा व माझा वेळ घेऊं नका. आणि शिवाय मी जें कांहीं सांगतें आहे, त्यावर थोडासा तरी विश्वास ठेवा. माझा तुमच्यावर पूर्ण विश्वास आहे."

"विश्वासानेंच विश्वास वाढतो हें जर खरें असेल तर कृपाकरून तुम्ही माझ्याशीं सरळपणानें बोला. परंतु प्रथम सांगावयाचें म्हणजे तुम्ही आपल्या तोंडावरील बुरखा काढून खालीं बसा तर खऱ्या. तीं पुस्तकें थोडा वेळ राहूं द्या, व तुमचें काय म्हणणें आहे तें स्पष्ट सांगा. डॉक्टरकडे सल्ला विचारण्याकरितां आल्यावर अशाप्रकारें तोंडावर बुरखा ठेवून व सर्व गोष्टी स्पष्टपणें न सांगून कसें भागेल ?" मी म्हणालों.

तिनें आपल्याकडून माझें आव्हान स्वीकारलें असें दिसलें. माझ्यासमोर बसून तिनें आपल्या तोंडावरचा बुरखा वर केला. मी ज्याला भीत होतों अशाच प्रकारची तिची मुखचर्या होती. चर्येवरून ती स्त्री थोडीशी आंतल्या गांठीची व मानी असावी.

ती मोहक असून तरुणी होती. तिच्या त्या घाऱ्या डोळ्यांत एक प्रकारचें समाधानाचें व तीव्र भावनांचें तेज चमकत होतें. तिच्या ओठांची ठेवण अशी होती कीं, तिचे मनांतून ज्या गोष्टीची परिस्फुटता व्हावयास नको असेल ती गोष्ट जणुंकाय ते आंतल्याआंत ठेवण्यास समर्थ होते. एक मिनिटभरच आम्ही एकमेकांकडे पाहिलें. शेवटीं तिच्या हुकमी, भावनाहीन परंतु रोखीव नजरेपुढें माझी दृष्टी मला दुसरीकडे लावणें भाग पडलें. कांहीं वेळानें ती एकदम म्हणाली "डॉक्टर, मला तुम्हापासून काय पाहिजे आहे याची तर तुम्हाला कल्पना आली ना ?"

"मला वाटतें मला त्याविषयीं कांहीं तर्क करतां येईल. तरीपण आपण मजजवळ स्पष्ट बोललेलेंच बरें. तुम्ही सध्यां ज्या संकटांत आहांत त्याचें निवारण व्हावें हीच तुमची इच्छा ना ? ज्यामुळें तुम्हाला ओकाऱ्या व फिटस् येतात त्याचें कारण नष्ट करावें हेंच तुमचें मागणें ना ?"

होकारार्थी तिनें नुसती मान हालविली.

"अशा गोष्टी करणें दोघांनाही घातुक आहे हें तुम्हास माहीत आहे ना ?" मी प्रश्न केला.

"होय" तिनें उत्तर दिलें.

"शिवाय अशा रीतीचें ऑपरेशन करणें हेंही बेकायदेशीर आहे." मी म्हणालों.

" परंतु कांहीं विशिष्ट परिस्थितींत तें बेकायदेशीर नाहीं, तर उलट तें जरुरीचेंच समजलें जातें. " ती म्हणाली.

" होय, पण अशावेळीं त्याला योग्य अशीं वैद्यकीय कारणें दाखवावीं लागतात " मी स्पष्टीकरण केलें.

" बर मग तशीं कारणें तुम्हाला सहज काढतां येतील, कारण तुम्ही डॉक्टरच आहांत. " ती म्हणाली.

यावेळीं तिनें अशा रीतीनें पाहिलें कीं, जणूं काय ती तसें करण्याविषयीं मला हुकूमच सोडीत होती; आणि तिच्या त्या हुकमी निश्चयापुढें मी अगदींच नादान ठरलों असतों. पण थोडासा धीर धरून मी तिच्या म्हणण्यास विरोध केला. कारण तिनें माझ्यावर अशा रीतीनें हुकमत चालवावी, हें मला पटेना. व म्हणून कांहींतरी अडचणी उपस्थित कराव्या या बुद्धीनें मी म्हणालों, " असें करण्यांत डॉक्टर्सनां नेहमींच समाधानकारक कारणें सांपडतात असें नाहीं. तरीपण माझ्या ओळखीच्या डॉक्टरचा सल्ला घेऊन पाहतों. "

" मला तुमच्या इतर डॉक्टरांशीं कांहीं कर्तव्य नाहीं. मी तुम्हांला म्हणून विचारण्याकरितां आलें आहे. " ती निश्चयानें म्हणाली.

" मलाच काय म्हणून ? " मी आश्चर्यानें विचारलें. तिनें शांतपणें उत्तर दिलें, " तें सांगण्यास माझी हरकत नाहीं.

मी मुद्दाम तुमच्याकडे आलें, कारण तुम्ही जरा या आडबाजूला राहतां, तसेंच तुमची व माझी याघूर्वी कधीच भेट झालेली नाहीं, व तुमची कर्तबगारी मशहूर आहे." ती बोलतांना अडखळली. "आणि तुम्हाला जर बरीचशी रक्कम रोख मिळाली तर तुम्ही या गांवांत फार दिवस राहणार नाहीं, असें वाटलें म्हणून."

या तिच्या बोलण्यानें माझें सर्व शरीर थरारलें आणि तिची ही व्यापारी हिशोबाची पद्धत पाहून तर मी थक्कच झालों. डोळ्यांत आसवें आणून माझी मनधरणी करणें तर बाजूलाच राहिलें. उलट तिनें माझी पैशांत किंमत केली व मला तिच्या इच्छेपुढें मान तुकवावयास लावण्याचा प्रयत्न केला. खरें सांगावयाचें म्हणजे मी अगदीं तिच्या कह्यांत गेल्या-सारखा झालों होतों. परंतु तिची ती माझ्याबरोबर वागण्याची उद्धटपणाची पद्धत पाहून मला तिची चीड आली व मी तिला कठोरतेनें विचारलें, "आपण जी मला मोठी रक्कम देऊं केली, ती कशाकरितां ?"

"आपण मला मदत करावी व तदनंतर या डचइंडीजमधून ताबडतोब निघून जावें म्हणून." तिनें स्पष्टपणें उत्तर दिलें.

"पण तसें करण्यानें माझ्या पेन्शनवर गदा येईल, ह्याचा तुम्ही विचार केला आहे काय ?" मी हा मुद्दा पुढें मांडला.

" होय, मी तुम्हांस जी फी देणार आहे ती तुमच्या पेन्शन न मिळाल्यामुळें होणाऱ्या नुकसानीची भरपाई पूर्णपणें करील. " ती म्हणाली.

" आपण स्पष्टपणें बोलतां हें चांगलें आहे. तरीपण मी आपणांस जास्त स्पष्टपणें विचारतों कीं, या फीची रक्कम किती असेल ? " मी विचारलें.

" ॲम्स्टरडम येथील बँकेवर १२ हजार गुल्डेनचा चेक. " ती म्हणाली.

राग व आश्चर्य यामुळें माझें शरीर कांपत होतें. खरोखर तिनें माझा पोंच ओळखला, माझी किंमत केली आणि डच गव्हर्नमेंटशीं केलेला करार मी मोडावा म्हणून मला फार मोठी रक्कम देऊ केली. मला पाहिलें नसतांनादेखील मी तिचें म्हणणें कबूल करीन, असें सुद्धां तिला वाटलें आं ? खरोखर मला तिचा इतका संताप आला होता कीं, तिच्या दोन श्रीमुखांत द्याव्या. परंतु मनःसंतापाच्या भरांत मी जेव्हां उठून उभा राहिलों, तेव्हां माझी दृष्टी तिच्या त्या उद्धट पण पाणीदार डोळ्यांकडे व ऐटबाज हुकमी चेहेऱ्याकडे गेली व माझ्या अंतःकरणांत एक तीव्र पाशवी पापवासना भडकली. माझ्या मनांतील विचारांची अंधुक छटा माझ्या चेहेऱ्यावर पसरली असावी. कारण त्याच क्षणीं तिनें एखाद्या भिकाऱ्याकडे पाहावें

त्याप्रमाणें माझ्याकडे तुच्छतेनें पाहिलें. आम्हांस एकमेकाचा किती तिटकारा वाटत आहे याची परस्परास चांगलीच जाणीव झाली. माझा उपयोग करून घ्यावा लागत आहे, या भावनेनें तिला माझा तिटकारा वाटत असेल तर माझी विनवणी करण्याऐवजीं ती माझ्या मदतीची हक्कानें मागणी करीत आहे म्हणून मला तिचा तिटकारा वाटला. मला वाटतें त्या स्तब्धतेच्या क्षणांतच आमचीं मनें एकमेकांस पूर्णपणें कळून चुकली असावी. ज्याप्रमाणें एखादा जहरी भुजंग चावावा त्याप्रमाणें एक अत्यंत भयंकर विचार मनांत येऊन मी म्हणालों.

"हो, पण मी फारच घाई करतो आहे. त्यामुळें तुमची विपरीत कल्पना होईल. माझ्या मनांत असली विचित्र कल्पना कशी उत्पन्न झाली याविषयीं मला तुम्हांस जरा उघडपणें सांगितलें पाहिजे."

× × × × ×

यानंतर पुन्हां तो थोडा वेळ थांबला. पुन्हां त्यानें थोडीशी व्हिस्की घेतली. त्याचा आवाज आता जास्तच कणखर येत होता. तो पुढें म्हणाला, "मी तुम्हांस कांहींतरी सबबी सांगत आहे असें समजू नका. परंतु मजविषयीं आपला गैरसमज होऊं नये, अशी माझी इच्छा आहे. ज्याला लोक "Good man"

असें म्हणतात, तो मी नाहीं अशी जरी माझी समजूत असली तरी ज्याज्या वेळीं मला शक्य असतें त्यात्या वेळीं मी लोकांना मदत करतों, हेंही खरें आहे. तसल्या त्या कोंदट वातावरणांत माझी सुखाची एकच कल्पना असे. आणि ती म्हणजे मी जें ज्ञान संपादन केलें आहे, त्या ज्ञानाचा गरीब लोकांचें आरोग्य सुधारण्याकडे उपयोग करणें, ही होय. आणि आपणांस माहितच आहे कीं, अशा गोष्टींत मनुष्याला सुखाचा खरा आनंद मिळतो. एक क्षणभर तरी कां होईना परंतु असाध्य रोग बरा केल्यावर आपण प्रतिईश्वर आहोंत, असें वाटते. पुष्कळ वेळेला एखाद्या नेटिव्हाला साप चावला म्हणजे त्याला मजकडे आणण्यांत येत असे. इतरांची समजूत अशी असे कीं, त्याच्या ज्या पायाला साप चावला असेल तो तोडावा लागणार म्हणून. परंतु मी त्याचा पाय शाबूत ठेवून प्राणहि वांचविले म्हणजे लोकांना आश्चर्य वाटत असें. एकदां तापानें फणफणलेल्या एका नेटिव्ह स्त्रीला औषधोपचार करण्यासाठीं म्हणून मी दूरवर जंगलांतसुद्धां गेलों. लाइप्झीकच्या हॉस्पिटलमध्यें काम करीत असतांना या स्थितीच्याप्रमाणें स्थितींत असलेल्या इतर स्त्रियांना मी अनेक वेळां मदत केली आहे. परंतु या प्रत्येक वेळीं येणारा पेशंट मला निराशा व मरण यांतून वांचवा अशा काकुळतीनें येत असे, व आपण खरोखरच एका नडलेल्या, विनवणी करणाऱ्या माणसास मदत करीत आहोंत याची जाणीव असे.

परंतु ह्या स्त्रीची सर्वच तऱ्हा निराळी. सहज हिंडतां हिंडतां आल्याचा बहाणा करून ती माझे घरांत शिरली, यामुळें मला प्रथमपासूनच तिचा राग आला होता. आणि तिच्या त्या उद्धटपणानें तर माझी तिडीकच उठली. आणि जगावें कीं, मरावें अशा प्रकारचा प्रश्न असतां ती मजकडे मोठ्या कुऱ्यानें व ऐटीनें आली यामुळें तर माझा मनःसंताप जास्तच दुणावला. जी ही स्त्री आज मला कस्पटासमान लेखून मालकिणीप्रमाणें हुकूम करण्याचा आव आणून मजकडे आली, तीच ही स्त्री दोनतीन महिन्यापूर्वी ज्या भावी मुलाचा नाश करण्याची इच्छा धरून ती आज मजकडे आली, त्याच मुलाच्या बापाच्या बाहुपाशांत कामुकतेनें विकारवश होऊन बेहोष पडली असेल··· हें दृश्य माझ्या मनःचक्षूसमोर स्पष्टपणें उभें राहिलें, व तीच ही स्त्री आतां मला तुच्छ समजतें काय? तें कांहीं नाहीं. त्या मनुष्याप्रमाणेंच तिनें माझ्याहि पुढें लोटांगण घालून मी म्हणेन तसें वागलें पाहिजे. व विकारवश होऊन स्वतःची कामवासना पुरविण्याकरितां तिनें त्या माणसाची ज्याप्रमाणें विनवणी केली असेल तशीच आतां माझी करावी अशी सैतानी वासना माझे मनांत उत्पन्न झाली, हें मला स्पष्टपणें तुम्हांस सांगावयाचें आहे. डॉक्टर या नात्यानें मी कधींही कोणाच्या परिस्थितीचा गैरफायदा घेतला नाहीं. आणि आतांसुद्धां पाशवी कामवासनेला बळी पडून ती या बाईकडून

पुरवून घ्यावी अशी माझी मुळींच इच्छा नव्हती. परंतु त्या गर्विष्ठ व उद्धट स्त्रीं समोर माझ्या पुरुषी महत्वाचा मोठेपणा सिद्ध करावा, एवढीच माझी मनीषा होती.

त्या स्त्रीनें मजवर एक प्रकारची मोहिनी टाकली होती हें तुम्हांस मी सांगितलेंच आहे. आणि शिवाय ह्या सात वर्षांत एकही युरोपियन स्त्री माझ्या बाहुपाशांत आली नाहीं तरी कामवासना तृप्तीच्या याचनेंत मला कधीही अडथळा आला नाहीं...येथील नेटिव्ह मुली इतक्या भित्र्या आहेत कीं, त्यांच्या गोऱ्या धन्यानें त्यांचा कबजा घेण्याचा प्रयत्न केला तर कृपेच्या आनंदानें त्या थरथर कापूं लागतात व त्या इतक्या अंकित व नम्र असतात कीं, तुम्ही मागाल तें देण्यास त्या तयार असतात. आणि म्हणूनच त्यांच्या त्या गुलामगिरीपुढें विषयविलासाच्या तीव्र इच्छेची नांगी लुळी पडते. परंतु अशा प्रकारची निष्ठुर, आंतल्या गाठीची, आढ्यतेखोर, गहन आणि जिच्या चेहेऱ्यावर नुकत्याच प्राप्त झालेल्या विकार-वशतेच्या फळाचीं स्पष्ट चिन्हें दिसत आहेत, अशी ती स्त्री पाहून माझें अंतःकरण कसें थरारलें असेल याची तुम्हीच कल्पना करा. आणि माझ्या सारख्या इतक्या दीर्घकाल मानवी सहवासापासून दूर असलेल्या, एकलकोंड्या, बुभुक्षित, नरपशूच्या पिंजऱ्यांत ही स्त्री मोठ्या धिटाइनें प्रवेश करीत

आहे, तेव्हां या सर्वांचा अर्थ काय असावा हें तुमच्या सहज ध्यानांत येईल. पुढें घडलेल्या गोष्टी तुम्हास समजाव्या म्हणून मी हें येवढ्या विस्तारानें सांगत आहे." माझ्या डोक्यांत अशा प्रकारचे विचार चालले होते. शेवटीं मी म्हणालों, " काय १२ हजार गुल्डेन ? छे, तेवढ्यांत मी हें काम करणार नाहीं "

जराशा निराशेनें तिनें मजकडे पाहिलें. खरी अडचण पैशाची नाहीं, हें तिनें ओळखलें असावें असें दिसलें. परंतु ती म्हणाली " मग तुम्हांस किती फी पाहिजे ? "

मी म्हणालों, " याबाबतींत जरा स्पष्टच असलेलें बरें. मी कांहीं कोणी दुकानदार नाहीं किंवा " रोमिओ व ज्यूलिएट " मधील वैद्याप्रमाणें पैशाकरितां विष विकणारा वैदूहि नाहीं. पैशाकरितां हपापलेला मी एक धंदेवाला आहे अशी जर तुमची समजूत झाली असेल तर तुम्हास जें पाहिजे असेल तें मजकडून मिळणार नाहीं."

" मग तुम्हीं हें काम करणार नाहीं तर?" ती म्हणाली.

"नाहीं, निव्वळ पैशाकरितां नाहीं.' मी ठासून उत्तर दिलें.

थोडा वेळ पुनः स्तब्धता होती. खोलींत इतकी गूढ शांतता पसरली होती कीं, तिच्या श्वासोच्छ्वासाचाही आवाज मला ऐकूं येत होता.

"मग तुम्हास दुसरे काय पाहिजे ?" तिनें कुऱ्यानें विचारलें. मी उध्धटपणानें उत्तर दिलें, "प्रथमतः तुम्हीं माझ्याशीं दुकानदार या नात्यानें बोलणें करावयाचें सोडून मनुष्य या नात्यानें बोलणें केलें पाहिजे. तसेंच माझ्या मदतीची अपेक्षा करून जेव्हां तुम्ही माझ्याकडे येतां तेव्हां दुसऱ्याच्या अंतःकरणाला विषासारख्या असणाऱ्या सोन्याच्या नाण्यांचा दिमाख दाखवीत न येतां, एका मनुष्य प्राण्यानें दुसऱ्या मनुष्य प्राण्यांस मदत करावी अशा विनयपूर्ण भावनेनें यावयास पाहिजे. मी नुसताच डॉक्टर आहे असें नाहीं. तसेंच सल्लामसलतीची ठरलेली वेळ एवढीच काय ती माझ्याजवळ असलेली आयुष्याची वेळ नव्हे. अशा दुसऱ्या कित्येक वेळां आहेत कीं, ज्यावेळीं येण्याची संधी आपण साधली असती तर बरें झालें असतें ?"

पुन्हां थोडा वेळ कोणीच कांहीं बोललें नाहीं. तिनें आपले सतेज ओंठ थोडेसे दाबले व ती म्हणाली, "मग काय मी तुमची विनवणी केली तरच तुम्ही हें काम करणार, असेंच ना ?"

"पुनः तुम्ही व्यापारी भाषा बोलूं लागलात. माझें वचन मिळालें तर तुम्ही विनवणी करणार, होय ना ? अगोदर विनवणी करा, मग मला काय करावयाचें तें मी करीन." मीं म्हणालो.

एखाद्या तडफदार व आवेशी वाघिणीप्रमाणें तिनें आपल्या मानेला एक हिसडा दिला व ती म्हणाली, “ मी तुमच्या मदतीसाठी विनवणी करणार नाहीं. त्यापेक्षां मी मृत्यू पत्करेन. ”

मीं संतापानें लाल झालों. “ जर तुम्ही विनवणी करणार नाहीं, तर मला माझी मागणी पुढें मांडली पाहिजे. मला वाटतें आतां जास्त शब्दांची जरूरी नाहीं. मला काय पाहिजे तें तुम्हाला आतां समजलेंच आहे. तुम्हीं तें मला दिल्यावर मी तुम्हास मदत करीन.” मी शांतपणें उत्तर दिलें.

एक क्षणभर तिनें माझ्याकडे टक लावून पाहिलें आणि एकदम तिनें खोखो हसण्यास प्रारंभ केला. तिच्या त्या धिक्कारयुक्त हंसण्यानें तर मी अगदीं थक्कच झालों. तिचें तें तिरस्कारयुक्त हसणें मला एखाद्या तोफेच्या धुमधडाक्याप्रमाणें वाटलें. त्याचक्षणीं ती दाराकडे वळली. मी इतका हतबल झालों होतों कीं, मला क्षमा करा असें म्हणण्यासाठीं मी आपोआप तिच्यामागून चाललों. परंतु तिनें मजकडे तोंड फिरविलें व ती हुकमी आवाजानें म्हणाली, “माझ्या मागोमाग येण्याचें धारिष्ट किंवा मी कोण आहे हें शोधून काढण्याचा प्रयत्न करू नका. तसें तुम्ही कराल तर पश्चात्ताप करीत

बसण्याची तुम्हावर पाळी येईल." इतकें म्हणून ती बिजलीप्रमाणें अदृश्य झाली.

+ + + +

पुन्हां सर्वत्र शांतता पसरली. कांहीं वेळानें अंधारांतून पुन्हां आवाज ऐकूं आला. अशा रीतीनें ती दरवाजांतून निघून गेली व मी खिळल्यासारखा त्या जागीं स्तब्ध उभा राहिलों. जणूंकाय मी तिच्या त्या नकारानें भारून गेलों होतों. ती जिना उतरून जातांना व घराचा दरवाजा बंद होताना मी ऐकला. माझ्या मनांतून तिच्या मागोमाग जावें असें होतें. तिला परत बोलवावें कीं मान पिरगळून तिचा जीव घ्यावा हें मला कळेना. कांहीं असलें तरी माझ्या मनांतून तिचा पाठलाग करावा असें होतें. पण तें कांहीं शक्य नव्हतें. तिच्या त्या बेफाम उत्तरानें तर मी स्तंभितच झालों होतों. कदाचित् तुम्हाला हें चमत्कारिक वाटेल, परंतु आहे हें असें आहे. पांचदहा मिनिटें तरी कांहीं एक हालचाल न करतां मी स्तब्ध उभा होतों.

परंतु थोड्याच वेळांत मी भानावर आलों, व जिन्यावरून खालीं धांवलों. तिला वसाहतीकडे जाण्याकरितां फक्त एकच रस्ता होता. मी माझी सायकल घेण्याकरितां शेडकडे धावलों. परंतु किल्ली विसरलों होतों, हें मागाहून माझ्या ध्यानांत आलें.

किल्ली आणण्याचें भानगडींत न पडतां मी बांबूचें तें दार बिजागऱ्या उचकटून मोकळें केलें. सायकल बाहेर काढली व तिचा पाठलाग करण्यास सुरवात केली. ती आपल्या गाडी-जवळ पोहोंचण्याच्या अगोदर तिला गांठून तिच्याशी बोललेंच पाहिजे असें मी ठरविलें.

त्या धुळीच्या रस्त्यांतून मी चाललों होतों. ती जेव्हां मला दिसावयास लागली तोपर्यंतचें अंतर लक्षांत घेतां ती घरांतून निघून गेल्यावर मी तेथें किती वेळ स्तब्ध उभा होतों, याची मला कल्पना आली. वसाहतीकडे जाण्याच्या अगोदर जंगलास वळसा घालून जेथें रस्ता पुढें जातो, तेथें ती मला दिसली. ती झपाट्यानें चालली होती. तिच्या मागें तिचा गडी, तो चिनी मुलगा रखडत चालला होता. मी तिला ज्या क्षणीं पाहिलें त्याच क्षणीं मी तिचा पाठलाग करीत आहे याची जाणीव तिला झालेली दिसली. कारण ती त्या मुलाशीं बोलण्याची थांबली आणि तो तेथेंच उभा राहिला व ती पुढें गेली. कां बरें ती एकटीच पुढें गेली असावी ? ज्या ठिकाणीं कोणीहि ऐकणार नाहीं अशा ठिकाणीं कां तिच्या मनांतून माझ्याशीं बोलावयाचें होतें ? मी सायकल जरा जोरानें चालवली आणि त्या मुलाच्या बाजूनें जातों तों तो माझ्यापुढें दत्त म्हणून उभा ! मी त्याला टाळण्याचा प्रयत्न केला परंतु मी त्याच्या धक्क्यामुळें रस्त्याच्या बाजूला पडलों.

त्या मुलाला शिव्या देत मी तसाच उठून उभा राहिलों व त्याला एक तडाखा देण्याकरितां मी मूठ वळून त्याला मारणार, परंतु त्यानें तो टाळला. त्या पोराच्या नादीं न लागतां मी माझी सायकल उचलली व तींवर मी बसणार तोंच तो बदमाष एकदम पुढें आला व त्यानें माझ्या सायकलचें हॅन्डल धरलें आणि तो मोडक्यातोडक्या इंग्रजींत म्हणाला, " महाराज, येथेंच थांबा. "

तुम्ही उष्ण कटिबंधांत कधीं राहिला नाहींत. एखाद्या नेटिवाचा व त्यांतल्या त्यांत नोकराचा उद्धटपणा किती असह्य होतो याची तुम्हाला कल्पना नाहीं. त्या पीतवर्ण चिनी पोऱ्यानें माझ्या सायकलचा दांडा धरावा आणि माझ्यासारख्या गोऱ्या मनुष्याला "आहे तेथेंच उभा रहा" असें सांगावें काय? त्याला माझें स्वाभाविक उत्तर म्हणजे मी त्याच्या नाकाडावर एक ठोसा लगावला. त्यानें चिर्र केलें, परंतु सायकलची पकड सोडली नाहीं.

"सरकार येथेंच उभे रहा." तो पुनः म्हणाला. माझें आटोमॅटिक पिस्तूल मी बरोबर आणलें नव्हतें, हें त्या पोऱ्याचें नशिबच म्हणावयाचें. नाहींतर मी खात्रीनें त्याला गोळी घातली असती. "ए कुत्र्या, चल हो बाजूला." मी ओरडलों. त्यानें माझ्याकडे भीतीनें टक लावून पाहिलें परंतु माझें त्यानें

ऐकलें नाहीं. मला भयंकर संताप आला व जर माझा येथें जास्त वेळ गेला तर ती निघून जाईल, अशी मला भीति वाटली. त्याबरोबर मी त्या पोऱ्याला असा एक जोराचा ठोसा लगावला कीं, तो रस्त्यांत लोळत पडला. आतां सायकल मोकळी झाली होती. परंतु मी जेव्हां सायकलवर बसावयास लागलों तेव्हां मला असें आढळून आलें कीं, सायकलचें पुढचें चाक वाकडें झाल्यामुळें फिरेना. चाक सरळ करण्याचा थोडा वेळ प्रयत्न केल्यावर मी ती सायकल रस्त्याच्या बाजूला माझ्या ठोशाबरोबर रक्तबंबाळ होऊन पडलेल्या चिनी पोऱ्या-जवळ टाकली [तो हळुंहळुं शुद्धीवर येत होता] आणि वसाहतीकडे जाणाऱ्या रस्त्यानें धांवत सुटलों.

होय, खरोखरच मी पळत सुटलों. तुम्ही ह्या इकडल्या प्रदेशांत राहिला नसल्यामुळें एखादा युरोपियन मनुष्य अशा रीतिनें पळत सुटणें म्हणजे केवढी आश्चर्याची गोष्ट आहे, ह्याची तुम्हाला कल्पना येणार नाहीं. कारण एखाद्या गोऱ्या युरोपियन मनुष्यानें आपला दर्जा सोडून नेटिव लोकांच्या घोळक्यांतून पळत सुटणें म्हणजे स्वतःचें हंसें करून घेण्यासारखें आहे. परंतु मला त्या वेळीं माझा दर्जावगैरेची कोठें जाणीव होती ? मी त्या झोंपड्या समोरून एखाद्या वेड्याप्रमाणें पळत सुटलों होतों आणि वसाहतींतील प्रख्यात डॉक्टर एखाद्या

रिक्शा हमालाप्रमाणें धांवत सुटलेला ते नेटिव लोक टक लावून पाहात होते.

मी वसाहतींत पोंहोंचतों तों घामानें अगदी निथळून गेलों होतों.

" गाडी कोठें आहे ? " मीं धापा टाकीत विचारलें.

" गेली साहेब, ती आतांच गेली " उत्तर आलें.

नेटिव लोक माझ्याकडे आश्चर्यानें पाहात होते. मी त्यांना अगदी घाणेरडा, घामानें चिंब झालेला वेडाच वाटलों असेन. मी रस्त्याकडे दूरवर नजर टाकली परंतु मला गाडी कोठेंच दिसली नाहीं तर गाडी गेल्यानंतरचा धुराळा मात्र दिसला. शेवटीं तिनें माझ्या हातावर तुरी दिल्याच. मला अडथळा करण्याकरितां म्हणून त्या चिनी मुलाला मागें ठेवण्याची तिची युक्ती सफल झाली.

तरी पण तिच्या पलायनानें तिचा हेतू साध्य झाला नाहीं. येथें युरोपियन समाजांतील ठिकठिकाणीं पसरलेलें जे लोक आहेत त्यांचीं तीं कृत्यें लोकांना सहज माहिती होतात. अशा-दृष्टीनें विचार केल्यास इकडील ही लहानलहान बेटें म्हणजे गांवेंच समजण्यास हरकत नाहीं. कारण बातम्या काय, येथें

हां हां म्हणतां पसरतात. ती स्त्री मला भेटावयास आली असतां तिचा शोफर आपला वेळ वसाहतींतल्या एका अड्ड्यावर घालवीत होता. थोड्याच वेळांत मला तिचें नांव व रेल्वेनें ७-८ तास प्रवासाच्या अंतरावर असलेल्या गांवीं ती राहातें वगैरे सर्व हकिगत समजली. ती एक इंग्लिश स्त्री असून तिचा नवरा एक अत्यंत श्रीमान् असा डच व्यापारी होता. तो व्यापारानिमित्त अमेरिकेकडे प्रवासास गेला असून थोड्याच दिवसांत परत येणार होता. त्यानंतर मग पतिपत्नींचें युरोपकडे जावयाचे ठरलें होतें.

× × × × ×

आतांपर्यंत ज्या ज्या गोष्टी घडल्या त्या तुम्हांस स्पष्ट करून सांगणें मला फारसें अवघड नव्हते. कारण आतांपर्यंत माझे हेतू उघडच होते. एक नाणावलेला निरीक्षक व डॉक्टर या नात्यानें माझ्या स्वत:च्या स्थितीचें मी सहज परीक्षण करूं शकलों असतों. परंतु आतांपासून पुढें मी एक वात झालेला बेहोष मनुष्य बनलों होतों. स्वतःवरचा माझा ताबा केव्हांच उडून गेला होता. माझें करणें विपरीत आहे हें माहित असून-सुद्धां मी तें करीत होतों. "आमोक" म्हणजे काय, तें तुम्हीं कधीं ऐकलें आहे काय ?

" होय, मले द्वीपकल्पांत राहणाऱ्या लोकांत बेहोष अशा उन्मत्त वायूच्या परिस्थितीला "आमोक" म्हणतात, असेंच ना?"

बेहोषपणापेक्षां किंवा उन्मत्त वायूपेक्षांसुद्धां ही परिस्थिती जास्त भयंकर आहे. ही परिस्थिती मनुष्यास एखाद्या पिसाळ-लेल्या कुत्र्याप्रमाणें वागावयास लावून त्याला नरहिंसा करणारा वेडापिसा बनाविते. ती एक अत्यंत विपरीत व भयंकर अशी मानासिक विकृति आहे. पूर्व प्रदेशांत असतांनां असल्या प्रकारच्या रोगाचा मी काळजीपूर्वक अभ्यास केला आहे. तरी-पण त्याच्या खऱ्या स्वरुपाची स्पष्ट कल्पना मला अजून झाली नाहीं. गुदमरणाऱ्या, दमट व निरुत्साही, वातावरणाचा मनुष्याच्या ज्ञानतंतूवर जोराचा परिणाम होऊन कांहींअंशी अशी परिस्थिती प्राप्त होते. मले द्वीपकल्पांत अशा रितीनें पिसाळलेल्या कुत्र्याप्रमाणें धांवत सुटणाऱ्या मनुष्यास साधारण-पणें स्त्रीविषयक चुरस, जुगारीमुळें आलेला तोटा वगैरे कांहीं-तरी कारण असतें. जणुंकाय कांहींच विपरित घडलें नाहीं अशा रितीनें तो मनुष्य प्रथमतः अगदी शांत असतो. मीहि माझ्या खोलींत ती स्त्री मला भेटावयास येण्यापूर्वी तसाच बसलों होतों.

परंतु तोच मनुष्य एकदम उठेल व रस्त्यानें धांवत सुटेल. त्याच्या मार्गांत येणाऱ्या कोणाहि मनुष्याचा खून करण्यास तो

मागेंपुढें पाहणार नाहीं. रक्तपातानें तो भयभीत होण्याऐवजीं जास्तच क्रोधान्ध बनेल. तोंडांत फेस आला आहे असा तो धांवतांना ओरडत सुटेल आणि मार्गांत कांहींहि आलें तरी आपली रक्ताळलेली ती कट्यार तशीच पाजरीत पुढें धांवत सुटेल. मृत्यूशिवाय दुसरे कोणीही ह्या पिसाळलेल्या मनुष्यास थांबवूं शकणार नाहीं, अशी लोकांची खात्री होती. "आमोक, आमोक" असें ओरडून लोक दुसऱ्यांना सावध करून स्वतः त्याच्या मार्गांतून बाजूला होतात. अशा रितीनें हा पिसाळलेला मनुष्य खून करील. पुढें पिसाळलेल्या कुत्र्याप्रमाणें गोळी घालून त्याला ठार मारण्यांत येईपर्यंत तो पुढेंच धांवत सुटतो.

अशाप्रकारें धांवत सुटणाऱ्या मले लोकांना मी पाहिलें असल्यामुळें माझी त्यावेळीं काय स्थिती झाली होती याची मला कल्पना आली. पिसाळलेल्या मले मनुष्याप्रमाणें आजूबाजूला कोठेंहि न पाहतां त्या इंग्लिश स्त्रीला पुन्हां पाहाण्याच्या अनिवार इच्छेनें तिचा पाठलाग करीत मी धांवत सुटलों. त्यावेळीं मी काय केले आणि काय केलें नाहीं, तें आतां मला स्पष्टपणें स्मरत नाहीं. मला वाटतें मी एक सायकल भाड्यानें घेतली व त्या स्त्रीचें नांवगांव समजून घेतल्यावर घराकडे परतलों.

दोनचार सूट एका बॅगमध्यें कोंबले. पैशाच्या नोटांचें पुडकें खिशांत घालून जवळच्या स्टेशनचा रस्ता पकडला.

माझ्या जाण्याविषयीं मी जिल्हाधिकाऱ्याला रिपोर्टहि केला नाहीं किंवा माझ्या कामाकरितां कोणी बदली देण्याचीहि व्यवस्था केली नाहीं. जमलेल्या माझ्या नोकर लोकांना कांहीं-एक न सांगतां मी माझें घर सोडलें. मला ती स्त्री भेटावयास आल्यापासून एका तासाच्या आंतच मी भूतकालांतील गोष्टींशीं माझा असलेला संबंध तोडून कोठेंतरी मोकाट हिंडत सुटलों.

मी जर विचार करण्याच्या परिस्थितींत असतो तर माझ्या ह्या सर्व घाईचा कांहींएक उपयोग नाहीं, हें मला पटलें असतें. सर्व दिवसभर आगगाडीनें प्रवास केल्यावर संध्याकाळीं ६ चे सुमारास ती स्त्री ज्या गांवीं रहात असे, तेथें येऊन पोहोंचलों. मोटरनें ती माझ्या अगोदरच येऊन पोहोंचली असावी अशी माझी खात्री होती. दहा मिनिटाचें आंतच मी तिच्या दरवाजासमोर येऊन ठेपलों. मी आपल्या नांवाचें कार्ड नोकराबरोबर (हा मुलगा तो चिनी मुलगा नव्हता. तो बहुतेक अजून आलाच नसावा.) दिलें. थोड्याच वेळानें तो परत आला व म्हणाला, "बाईसाहेबांना बरें वाटत नसल्यामुळें त्या तुम्हांला भेटूं शकत नाहींत."

मी रस्त्यांत तसाच स्तंभित होऊन उभा राहिलों. तिला पश्चात्ताप होऊन ती पुन्हां मला बोलावणें पाठवील या व्यर्थ आशेनें एक तासभर तिचे घरांभोंवतीं मी घुटमळत होतों.

शेवटीं मी जवळच्याच एका हॉटेलांत खोली घेतली व व्हिस्कीच्या दोन बाटल्यांची ऑर्डर दिली. व्हिस्कीच्या सहाय्यानें मी माझी निराशा व दुःख विसरून झोंपीं गेलों. जन्मापासून मृत्यूपर्यंत चाललेल्या जीवन कलहाच्या शर्यतींत गाढ निद्रा एवढीच एक तात्पुरती सुखाची गोष्ट आहे.

× × × × ×

बोटीवर पहाटेच्या २ चे ठोके पडले. त्या आवाजानें आत्मवृत्त सांगणारा गृहस्थ थोडासा दचकला; परंतु लगेच भानावर येऊन त्यानें आपली हकिकत सांगण्यास सुरुवात केली.

" ह्यानंतर काय झालें हें सांगणें मोठें कठीण आहे. मला वाटतें मला बहुतेक ताप भरला होता. मनःसंतापामुळें मला वेड लागण्याची पाळी आली होती. मी त्या समुद्र-किनाऱ्यावरच्या गांवीं पोहोंचलों. तेव्हां मंगळवारची संध्याकाळ होती आणि बुधवारी सकाळीं मला असें कळलें कीं, तिचा नवरा शनिवारी संध्याकाळीं परत येणार आहे. तिला त्या अडचणींतून सोडविण्यास अजूनही तीन दिवस होतें. एक क्षणही वाया जाऊं देतां कामा नये हें मला माहित होतें......
...पण ती तर माझी गांठही घेण्यास तयार नव्हती. तिला मदत करण्याची माझी इच्छा व माझ्या मूर्खपणाबद्दल तिची

माफी मागण्याची मनीषा तर आतां इतकी बलवत्तर झाली कीं, माझ्या मस्तकांतील मेंदू तडकून त्याच्या ठिकऱ्या उडतात कीं काय असें मला वाटलें. प्रत्येक क्षण बिनमोल होता. आणि मी तर अशारीतीनें तिच्याशीं वर्तन केलें होतें कीं, ती मला जवळ येऊं देण्याससुद्धां तयार नव्हती. एखाद्या मनुष्यास खून करणाऱ्या इसमाविषयीं इषारा देण्याकरितां म्हणून आपण त्याच्या मागोमाग धांवावें व त्यानें आपण त्याचा खून करणार असें समजून खून करणाऱ्या इसमाकडेच धांवत सुटावें; तशीच ही परिस्थिती झाली. अनुचित मागणीनें अपमान करून पुन्हां तीच गोष्ट मागण्याकरितां आपला पाठलाग करणारा एक वेडापिसा मनुष्य अशीच तिनें माझी किंमत केली असेल.

आणि या सर्व गोष्टींतला अविचार तो हाच, तिला मदत करावी हीच माझी एक इच्छा ! पण ती तर माझें तोंडही पाहण्यास तयार नव्हती. तिला त्या परिस्थितींतून सोडविण्याकरितां मी कोणतेंही साहस करण्यास तयार होतों; पण हें तिला आतां कळावें कसें ?

दुसरे दिवशीं सकाळीं जेव्हां मी तिला पुन्हां भेटावयास गेलों तेव्हां तो चिनी छोकरा दारांत उभा होता. मला वाटतें मी ज्या गाडीनें आलों त्याच गाडीनें तो परत आला असावा.

तो बहुतेक माझ्या पाळतीवरच असावा. त्याच्या चेहेऱ्यावरच्या लहान जखमा मी पहातों न पहातों तोंच तो नाहींसा झाला. तो बहुतेक मी आल्याची वर्दी देण्यास गेला असावा. माझें मनांतून तिला मदत करावयाची आहे याची शेवटीं तिला जाणीव होऊन कदाचित् माझी मदत घेण्यास ती तयारही झाली असती. परंतु त्या पोऱ्यास पाहिल्याबरोबर माझ्या कृत्याची मला इतकी लाज वाटली कीं, त्यामुळें माझें डोकें पुन्हां भडकून माझ्या नांवाचें कार्ड आंत पाठविण्याचा धीर न होऊन मी परत फिरलों.

या अपरिचित गांवांत वेळ कसा घालवावा हेंच मला समजेना. शेवटीं ज्या व्हाइस रेसिडेंटचा अपघातांत मोडलेला पाय मी नीट बसवून दिला होता, त्याला जाऊन भेटावें अशी मला कल्पना सुचली. अपेक्षेप्रमाणें तो घरीं होता व मला पाहून अर्थातच त्याला आनंद झाला. मला डचमनप्रमाणें डच भाषा सफाईनें बोलतां येते, हें मी तुम्हांस सांगितलें आहे काय? मी हॉलंडमध्यें दोनवर्षें शाळेंत शिकलों आहे. आणि लाइप्झीकचें हॉस्पिटल सुटल्यानंतर मी डच नोकरींत शिरलों त्यालाही हें एक कारण आहे.

माझ्या त्यावेळच्या वागण्यांत कांहींतरी तऱ्हेवाईकपणा असला पाहिजे खास. मी बरा केलेला तो रोगी मधुनमधून

मजकडे पाही व मला कांहींतरी वेडाची लहर आली आहे अशी त्याला अंधुक कल्पना आली असावी असा मला भास झाला. " माझी बदली करा " असें मी त्यास सांगितलें. तसल्या त्या रानटी भागांत यापुढें मला राहणें नको असून राजधानीच्या शहरीं माझी बदली व्हावी, या माझ्या अकल्पित मागणीचा अधिक खुलासा समजण्याच्या इच्छेनें त्यानें मजकडे पाहिलें; व ज्याप्रमाणें एखादा डॉक्टर आपल्या पेशंटकडे पाहतो त्याप्रमाणें माझ्याकडे निरखून तो म्हणाला, " डॉक्टर, हा नर्व्हस् ब्रेकडाऊन दिसतो. मी तुमच्याकरितां व्यवस्था करतों परंतु तुमच्या जागीं काम करण्यास दुसरा कोणी मनुष्य मिळेपर्यंत तुम्हाला तीनचार आठवडे थांबले पाहिजे. "

" काय तीनचार आठवडे ! " मी निराशामिश्र उतावळे-पणानें उद्गारलों. " माझी तर एक दिवसही थांबण्याची तयारी नाहीं. "

" मला वाटतें डॉक्टर, तुम्हाला कांहीं दिवस थांबलें हें पाहिजेच. कांहीं झालें तरी तुमच्या जागेवर काम करण्याकरितां कोणीतरी माणूस असणे जरूर आहे. मी या बाबतींत आजच खटपट करण्यास सुरुवात करतों. "

मी माझे ओठ चावत तसाच तेथें उभा राहिलों. सेवाधर्म परम गहन याची मला आज कल्पना आली. त्याची

इच्छा व नियम धाब्यावर बसवावेंत असें माझ्या मनांत आलें. परंतु रेसिडेंट हा मोठा धूर्त माणूस होता व माझे त्याच्यावर उपकार झाले असल्यामुळें मला एकदमच नाखूष करण्याची त्याची इच्छा नव्हती. मी आतां कांहींतरी रागानें उत्तर देणार अशी अटकळ बांधून तो पुढें म्हणाला, "तुम्ही येथें अगदीं एकलकोंडेपणानें राहात असल्यामुळें तुमच्या ज्ञानतंतूवर परिणाम झाला आहे. तुम्ही कधींहि रजा मागितली नाहींत किंवा कधीही येथें आला नाहींत, याचेंच आम्हाला आश्चर्य वाटत आहे. केव्हांकेव्हां आनंदी मित्रांचा सहवास जर तुम्हांला घडला असतां तर त्यामुळें तुम्हास पुष्कळ बरें वाटलें असतें. आजच संध्याकाळीं येथील गव्हर्नमेंट हाऊसवर स्वागतसमारंभ आहे. तुम्ही तिकडे चलाना! वसाहतींतील ज्या लोकांनीं मला तुमच्याविषयीं विचारलें त्यापैकीं बरेंच लोक आज तेथें येतील आणि त्यांना खरोखरच तुमची ओळख करून घेण्याची इच्छा आहे."

मी माझे कान लगेच टवकारले व म्हणालों "काय, लोक माझ्याविषयीं विचारतात? त्यांना माझी ओळख करून घेण्याची इच्छा आहे?" ती स्त्रीहीपण त्यापैकींच एक असेल कां? मला हा विचार मादिरेइतकाच प्रिय वाटला, मी पुन्हां भानावर आलों. रेसिडेंट साहेबांचे आभार मानले आणि स्वागतसमारंभास येण्याचें कबूल केलें.

माझ्या अधीरतेच्या तीव्रतेमुळें मी तेथें जरा लवकरच गेलों. रेसिडेन्सी ( गव्हर्नमेंट हाऊस ) मधील भव्य दिवाण-खान्यांत मी काय तो एकटाच होतों. मी तेथें तसाच बसलों. आणि कामांत इकडून तिकडे अनवाणी फिरणाऱ्या नेटिव लोकांच्या पावलांचा तो मृदु आवाज ऐकत राहिलों तेव्हां ते नोकर मजकडे कुतुहल बुद्धीनें पाहात आहेत असें मला वाटलें. मी १५ मिनिटें तरी त्या स्तब्धतेंत एकटा बसून राहिलों होतों. मांडामांड करून नोकर गेल्यावर तर तेथें इतकी शांतता पसरली कीं, माझ्या खिशांतील घड्याळाचा टिक्‌टिक् आवाजसुद्धां स्पष्टपणें मला ऐकू येत होता.

कांहीं वेळानें मंडळी यावयास सुरुवात झाली. कांहीं सरकारी अधिकारी आपापल्या पत्नीसह आल्यानंतर व्हाइस रेसिडेंटसाहेबही आले. त्यांनीं अत्यंत सभ्यतेनें माझें स्वागत केलें. त्यांच्याबरोबर चाललेल्या लांबलचक संभाषणांत मी बराच वेळ टिकाव धरला होता. परंतु एकदम मी नर्व्हस झालों व अडखळलों. कारण तेवढ्यांतच तेथें ती स्त्री येऊन दाखल झाली व व्हाइस रेसिडेंटानीं माझ्याशीं चाललेलें संभाषण आटोपतें घेऊन ते दुसऱ्याशीं बोलण्यांत गुंतले नाहीं-तर मला वाटतें मलाच त्यांच्याकडे पाठ फिरवून स्तब्ध उभें रहावें लागलें असतें. त्या स्त्रीनें पिवळा रेशमी झगा परिधान

केला होता. त्यामुळें तिचे ते हस्तिदंतासारखे शुभ्र स्कंधप्रदेश फारच खुलून दिसत होते. एका घोळक्यामध्यें आनंदानें संभाषण करीत असतांना ती मला दिसली, परंतु तिच्या त्या सुंदर हंसण्याखालीं जें कांहीं कठोर गूढ दडलेलें होतें तें फक्त मलाच माहित होतें. मी तिच्याजवळ गेलों परंतु तिची मजकडे पाहण्याचीहि इच्छा दिसेना. तिच्या त्या हंसण्यानें पुन्हां मला वेड लावण्याची पाळी आणली. कारण तिचें तें हास्य केवळ कृत्रिम आहे हें मी जाणत होतों. आज बुधवार असून शनिवारी तिचा नवरा परत येणार हा विचार माझ्या मनांत आला. असें असूनसुद्धां ती इतक्या निष्काळजीपणानें कसें हंसूं शकते ? मनाच्या अस्वस्थतेमुळें हातांतील पंख्याचे तुकडे तुकडे करून टाकण्याऐवजीं तिला वारा घेतांना कांहींच कसें वाटत नाहीं याचेंच मला आश्चर्य वाटलें. माझ्यासारख्या तिऱ्हाईत माणसालासुद्धां तिला होणाऱ्या त्या यातना दुःख देत होत्या. हा कृत्रिम हास्याचा प्रयत्न म्हणजे अंतःकरणांत चाललेली भयंकर खळबळ झांकण्याचेंच द्योतक नसेल काय ?

शेजारच्या खोलींतून संगिताचे सूर येत असून नृत्यास प्रारंभ होणार होता. एका मध्यम वयाच्या सरकारी अधिकाऱ्यानें नाचावयास चलण्याविषयीं तिला विनंती केली. ती ज्यांच्याशीं बोलत उभी राहिली होती, त्यांच्याकडे दिलगिरीच्या

दृष्टीनें पाहून ती त्या सरकारी अधिकाऱ्याबरोबर नृत्य स्थानाकडे गेली. ह्यामुळें ती आतां अगदीं माझ्याजवळ आली व तिला मला टाळणें शक्य नव्हतें. क्षणभरच ती थोडी दचकल्यासारखी दिसली. तिची व माझी ओळख आहे असें दाखवावें कां नाहीं याचा मी विचार करतों आहे तोंच तिनें परिचयाच्या मुद्रेनें मान हालविली व म्हटलें, "Good evening doctor!" लागलीच ती तेथून निघून गेली. त्या सहजगत्या फेंकलेल्या दृष्टिक्षेपाआड काय काय गोष्टी दडलेल्या आहेत याची जाणीव इतरांनां कोठून असणार! खरें सांगावयाचें तर मी स्वतःसुद्धा गोंधळलो होतों. तिनें उघड रीतीनें माझ्याशीं कां बरें ओळख दाखविली! समेटाचें तर हें चिन्ह नव्हतें नां! कां निव्वळ आश्चर्यामुळें तिच्या हातून असें घडलें! परंतु मी तरी हें कसें सांगूं शकणार! एक गोष्ट मात्र खरी कीं, माझें अंतःकरण अगदीं पिळवटून निघत होतें. ती "वाल्झगतीचा" नाच नाचत असताना मी तिजकडे पाहत होतों. तिच्या अधरोष्ठावर समाधानाचें हास्य चमकत होतें. नाचाकडे तिचें लक्ष नसून तिला व मला माहित असलेल्या गुप्त गोष्टींचा विचार तिच्या मनांत चाललेला असावा असें मला वाटत होतें. ह्या विचारानें माझ्या मनांतील काळजी, आकांक्षा व गोंधळ द्विगुणीत झाला. माझ्याकडे कोणी पाहत होतें काय हें मला जरी सांगतां येत नव्हतें तरी माझें आतुरतेनें चाललेलें निरीक्षण व तिची उघडउघड दिसणारी बेपर्वाई

ह्या गोष्टी तर स्पष्टच होत्या. मला तर तिच्याशिवाय दुसऱ्या कोणाकडे पाहणें शक्यच नव्हतें. आपल्या पार्टनरच्या खांद्यावर हात ठेवून ती परत येत असतां तिनें मजकडे रागीट व चढेल दृष्टी फेंकली. जणुं काय ती दृष्टी मला आत्मसंयमन करण्यास सुचवीत होती.

परंतु पूर्वी सांगितल्याप्रमाणें मी तर अगदी वेडापिसा बनलों होतों. माझ्याकडे तिनें फेकलेल्या दृष्टिक्षेपाचा अर्थ काय हें मी पूर्ण जाणून होतों. "संयमन कर, माझ्याकडे लोकांची नजर जाईल अशा रीतीनें पाहूं नकोस," हाच त्याचा अर्थ ना? "लौकिक समारंभाचे प्रसंगीं कांहींतरी सारासार विचार चालव," असेंच ती मला खुणावित नव्हती काय? मला तर असें वाटूं लागलें कीं, आतां जर मी शांतपणें घरीं गेलों तर उदईक ती माझी गांठ घेण्यास कांकूं करणार नाहीं. मी सभ्यतेनें वागावें हेंच तिला पाहिजे होतें. तेथें उगीच कांहीं विचित्र प्रकार होऊं नये हीच तिची इच्छा दिसली. होय तिला काय पाहिजे होतें तें मला समजलें. परंतु मी तर इतका पिसाळलेला बनलों होतों कीं, तिच्याशीं त्या ठिकाणीं व त्याक्षणींच बोललें पाहिजे, असें मला वाटत होतें. ती ज्या घोळक्यांत बोलत होती, तिकडे मी वळलों. ते सर्वच लोक मला परके होते तरीसुद्धां मी तसाच त्यांच्यामध्यें घुसलों. मी तिचें बोलणें ऐकत तेथें उभा

राहिलों खरा परंतु तिची दृष्टी ज्या ज्या वेळीं मजकडे जाई त्या त्या वेळीं मला भीति वाटे. अर्थातच् माझ्याशीं तेथें कोणींच बोललें नाहीं व तिला तर माझ्या येण्यानें रागच आला असावा. मी तेथें किती वेळ उभा राहिलों असेन हें मला सांगतां येत नाहीं. एखाद्या भारलेल्या मनुष्याप्रमाणें मी तेथें जगाच्या अंतापर्यंतहि उभा राहिलों असतों. तिला मात्र तो ताण असह्य होत होता. एकदम ती तेथून जावयास निघाली. आणि अत्यंत मोहकपणानें परंतु बेपर्वाईनें म्हणाली बॅर, मी दमले आहे. जातें मी आतां, Good Night इतर लोकां-प्रमाणें तिनें माझ्याकडेही पाहून मान हालविली. ती चालली असताना तिच्या त्या सुकुमार गौरवर्ण बांधेसूद पाठीकडे आणि त्यावरच्या त्या पिवळ्या रेशमी झग्याकडे माझी दृष्टी गेली. त्या रात्रीं मी तिला पुन्हां पाहूं शकणार नाहीं, याची त्यावेळीं मला पुसटसुद्धां कल्पना क्वचितच् आली असेल. मी तसाच तेथें उभा होतों.

मी स्वतः किती मूर्ख बनलों होतों ह्याची तुम्हास स्पष्ट कल्पना येण्यासाठीं सर्व चित्र तुमच्यापुढें मला स्पष्ट मांडलेंच पाहिजे. रेसिडेंसीमधील तो भव्य दिवाणखाना आतां बहुतेक रिकामा होत आला होता. दिवे मात्र तसेच तेवत होते. निमंत्रित मंडळींपैकीं कांहीं बॉलरूममध्यें नाचत होती. जे

लोक थोडेसे वयातीत होते, त्यांनीं ठिकठिकाणीं आपले गट बनविले होते. कांहीं लोक बोलतबोलत इकडेतिकडे हिंडत होते. त्या भव्य दिवाणखान्यांतून जातां जातां ती प्रत्येक मनुष्याचा अशा ऐटीनें व मोहकरीतीनें निरोप घेत होती कीं, मीहि मोहित होऊन गेलों. मी जों थोडासा भानावर येतों तों ती दाराजवळ गेली सुद्धां! एका क्षणांत आतां ती निघून जाणार याची जाणीव होऊन मी तिच्यामागें धांवत सुटलों. धांवतांना त्या पॉलिश केलेल्या तक्तपोशीवर माझे पंपशू करकर वाजत होते. प्रत्येकजण माझ्याकडे चमत्कारिकरीतीनें पाहूं लागला. त्यामुळें मी अगदीं खजील होऊन गेलों. तरीपण मी तसाच पुढें धांवत होतों. ती दरवाज्याजवळ पोहोंचते तोंच मी तिला गांठलें. ती एकदम मजकडे वळली. अंतस्थ क्रोधानें तिची मुद्रा लाल झाली होती.

परंतु आत्मसंयमन करण्याची तिची शक्ति माझ्यापेक्षां जास्त असल्यामुळें तिनें रागाचा अविर्भाव एका क्षणांत बदलला व ती मोठ्यानें हंसूं लागली. सर्व लोकांना ऐकूं जाईल इतक्या मोठ्यानें व सहज विनोदानें ती म्हणाली, "काय डॉक्टर, मग सरतेशेवटीं माझ्या मुलाला काय औषध द्यावयाचें याची तुम्हास आठवण झाली तर! तुम्ही शास्त्र शिकलेले लोक म्हटले म्हणजे असें अधूनमधून विसराळू

असतां, होय ना ?" जवळच उभे असलेले दोन गृहस्थ थट्टेनें हंसले. माझ्या मनाचा गोंधळ झांकण्यासाठीं तिनें केलेली ही धूर्तता खरोखरच मोठी प्रशंसनीय होती आणि तिनें दिलेली ती सूचना अमलांत आणावी असें मला वाटलें. खिशांतील पॉकेट डायरी काढून दिलगिरी दर्शवीत त्यांतील एक प्रिस्क्रिप्शनचा फॉर्म काढून मी तिच्या हातांत दिला. थोडेसें स्मित करून तिनें तो माझ्या हातांतून घेतला व 'गुडनाइट' म्हणून ती निघून गेली.

तिनें मला अडचणीच्या प्रसंगांतून सोडवलें परंतु माझा तिच्याशीं आलेला संबंध याचा विचार माझ्या मनांत घोळत राहून माझी स्थिती अगदीं निराशामय झाली होती. माझ्या अक्कलशून्य मूर्खपणाबद्दल व लोचटपणाबद्दल ती माझा मृत्युपेक्षां-सुद्धां जास्त तिटकारा करीत असली पाहिजे. आणि मी कितीहि वेळां पुनः पुनः तिजकडे आलों तरी एखाद्या कुत्र्याप्रमाणें ती मला झिडकारणारच.

मी त्या दिवाणखान्यांत तसाच वेड्यासारखा उभा होतों. सर्वजण मजकडे पहात होते. माझ्या वागण्यांत त्यांना कांहींतरी चमत्कारिक दिसलें असलें पाहिजे खास! मी दारू पिण्याच्या जागेकडे जाऊन एकामागून एक असे चार ब्रँडीचे ग्लास घशांत ओतले. माझ्या ज्ञानतंतूंच्या अगदीं चिंधड्या

उडाल्या होत्या व चेतना येण्यासाठीं अशा प्रकारचा डोस घेण्याशिवाय गत्यंतर नव्हतें. एखाद्या चोराप्रमाणें मी बाजूला असलेल्या एका लहानशा दारांतून निसटलों. कोणी जरी एखादें राज्य देऊं केलें असतें तरी लोकांच्या नजरेला नजर भिडवून त्या भव्य दिवाणखान्यांतून जाण्याचें मी नाकारलें असतें. मी पुढें काय बरें केलें ? माझें मलाच आठवत नाहीं. एका दालनांतून दुसऱ्या दालनांत भटकून वेळोवेळीं माझी विचारशक्ति ठार मारण्याचा मी प्रयत्न करीत होतों. ज्या हास्याच्या योगानें तिनें मला त्या गोंधळलेल्या परिस्थितींतून सोडविलें तें तिचें कृत्रिम हास्य अजूनसुद्धां माझ्या डोळ्यासमोरून हलेना. मी माझें पिस्तुल बरोबर आणलें नाहीं म्हणून मला अतिशय पश्चात्ताप होत होता. कारण शेवटीं पिस्तूल उडवून तरी डोक्याच्या ठिकऱ्या उडवाव्या असें मला वाटलें. पिस्तुलावरच माझे विचार खिळून राहिले व अशारीतीनें आयुष्याचा शेवट करून घेण्याचें मी ठरविलें. दमलेला व श्रांत झालेला असा मी शेवटीं उतरलों होतों त्या हॉटेलकडे निघालों. त्या पहाटेच्या प्रसंगीं स्वतःचा खून करण्यापासून मी परावृत्त झालों तो मनाच्या कातरतेमुळें नसून, तिला माझ्या मदतीची जरूरी भासल्यास ती करणें माझें कर्तव्य आहे ह्या कर्तव्यजागृतिमुळें होय. दोन दिवसांत तिचा नवरा परत येईल व त्याला हें गूढ कळल्यावर तसल्या त्या लाजिरवाण्या

परिस्थितींत एक क्षणभरही राहण्यास ती मानी स्त्री तयार होणार नाहीं. माझ्या अधिरतेला व मी केलेल्या घोडचुकीला दोष देत अस्थिर मनानें मी माझ्या खोलींत इकडे तिकडे येरझारा घालीत होतों. मुख्य प्रश्न असा कीं, ती मला पुन्हां भेटणार कशी ? तिला मदत करण्याची माझी प्रांजल इच्छा आहे याविषयीं तरी आतां तिची खात्री पटावी कशी ? ती तर माझें मुखावलोकनही करण्यास तयार नव्हती. तिचें तें तुच्छपूर्ण विकट हास्य सारखे माझ्या मनःचक्षूसमोर नाचत होतें. माझ्या त्या १० फुटी रुंद खोलींत मी सारखा इकडे तिकडे येरझारा घालीतच होतों. शेवटीं दिवस उगवून सूर्याचे किरण व्हरांड्यांत पडले. तुम्हाला माहितच आहे कीं, उष्णकटिबंधांत बहुतेक लोक सकाळीं सहा वाजतां उठून कामाला लागतात.

खुर्चीवर अंग टाकून पत्रलेखनाकरितां मी एक कागद घेतला व मला सुचेल त्याप्रमाणें मी तिला पत्र लिहू लागलों. मी अत्यंत बदमाश किंवा वेडापिसा बनलों असलों तरीसुद्धां तिनें मला क्षमा करून माझ्यावर विश्वास ठेवावा व मी तिला जी मदत करणार आहे ती स्वीकारण्यास आपली संमती दर्शवावी. तिला पाहिजे असल्यास तदनंतर तिच्या मनाप्रमाणें त्या गांवांतून, त्या वसाहतींतून किंबहुना जगांतून नाहींसें

होण्याचें वचन देण्यास मी तयार होतों. या आणीबाणीच्या-प्रसंगीं तिनें मला क्षमा करून माझ्यावर विश्वास ठेवावा व माझ्या मदतीचा अव्हेर करू नये, एवढी माझी याचना होती.

मी तें जवळ जवळ वीस पानीं पत्र बंद केलें. एखाद्या वेड्याच्या इस्पितळांतील वेड्यानें किंवा तापांत वात झालेल्या इसमानें लिहिलेल्या पत्राप्रमाणेंच तें पत्र असंबद्ध झालें असलें पाहिजे. पत्र संपतें तों मी धामानें अगदीं निथळून गेलों होतों. उठून उभे राहिल्यावर सर्व खोलीच माझे भोंवतीं गरगर फिरत आहे असें मला वाटलें. पाण्याचा ग्लास झोकून मी काय लिहिलें आहे तें वाचूं लागलों. पण माझे डोळे एकाही शब्दावर स्थिर ठरेनात. मी पाकीट हातांत घेतों तों ज्यामुळें तिचें अन्तःकरण द्रवेल असा विचार मनांत आल्यामुळें मी तो पत्राच्या शेवटच्या कागदाच्या मागें मुद्दाम ताजा कलम-रूपानें शब्दांत मांडला. " आपल्या माफीची मी हॉटेलमध्यें वाट पहात आहे. आज संध्याकाळचे आंत आपल्याकडून कांहींच न कळल्यास पिस्तुलानें मी स्वतःस मारून घेईन. "

मी पत्र बंद केलें. एका पोऱ्यास हाक मारली व तें पत्र तावडतोब तिला नेऊन देण्यास सांगितलें. उत्तराची वाट पहात बसण्यापलीकडे मला कांहींच करण्यास राहिलें नव्हतें.

+ + + +

ह्यानंतर थोडावेळ तो आत्मनिवेदक गृहस्थ थांबला. नंतर त्यानें आपल्या गोष्टीला सुरुवात केली. तो म्हणाला, " ख्रिश्चन धर्माचेंसुद्धां मला आतां महत्व वाटेनासें झालें. त्या जुन्या स्वर्ग-नरक यासंबंधीच्या कथांनीं माझ्यावर कसलाही परिणाम होणें शक्य नव्हतें. खरोखरच नरक यातना म्हणून जर कांहीं असतील तर त्या हॉटेलमध्यें मी जे तास घालवीत होतों त्यापेक्षां त्या जास्त असह्य व तापदायक असणें शक्य नाहीं. दुपारच्या उष्णतेनें उकडून निघणाऱ्या त्या लहानशा खोलींत मी बसलों होतों. उष्णकटिबंधांतील हॉटेलमधील त्या खोल्या म्हणजे काय याची तुम्हाला कल्पना आहेच. त्यांत म्हणजे एक टेबल, एक खुर्ची व एक बिछाना येवढेंच सामान मिळावयाचें. तसल्या त्या खोलींत मी एका खुर्चीवर बसलों असून समोर असलेल्या टेबलावरच्या घड्याळाकडे व पिस्तुलाकडे माझी दृष्टी लागली होती. खाणें नाहीं, पिणें नाहीं, कांहीं नाहीं. अशी सारखी वाट पाहण्यांत मी तो दिवस घालविला. जरी मी तेथें एखाद्या पुतळ्याप्रमाणें स्तब्ध बसलों असलों तरी मले द्वीपकल्पांतल्या सैरावैरा धांवणाऱ्या वेड्याप्रमाणें अगर पिसाळलेल्या कुत्र्याप्रमाणें माझ्या मनांत व विचारांत सारखी धावपळ चालत होती.

तीन वाजून बावीस मिनिटांनीं ( माझे डोळे अजून सारखे घड्याळालाच खिळलेले होते ) दरवाज्यावर कोणीतरी धक्का

दिला. हातांत कागदाची गुंडाळी असलेला असा एक नेटिव्ह छोकरा मी पाहिला. मी तो कागद त्याच्या हातांतून हिसकावून घेतला आणि मी तो वाचूं लागण्याचे अगोदर तो मुलगा निघून गेला. खरें म्हटले म्हणजे मला तिनें पाठविलेला तो निरोप वाचताच येईना. मला त्या शब्दांचा अर्थ कळेना. डोक्यावर थोडेसें गारपाणी ओतल्यावर माझा मेंदू थोडासा शांत झाला व इंग्रजी भाषेमध्यें पेन्सिलीनें लिहिलेल्या खालील मजकुराचा मला बोध होऊं लागला.

" आतां त्या गोष्टीस फारच उशीर झाला आहे. आपण हॉटेलांत आहांत तेथेंच थांबा. कदाचित् अगदीं शेवटीं मला तुम्हांस बोलवावें लागेल " त्या चुरगळलेल्या कागदावर सही वगैरे कांहीं नव्हती. एखाद्या प्रॉस्पेक्टस् मधला फाडून घेतलेला तो कोऱ्या कागदाचा अर्धा तुकडा असावा. कापऱ्या हातानें तो मजकूर लिहिलेला असावा. मला तरी तें कसें सांगतां येणार ? जरी काळजी, आतुरता, घाई व भीति यांचा प्रबल पगडा माझे मनावर बसला होता, तरीपण सरतेशेवटीं तिनें मला उत्तर पाठविलें याबद्दल मला आनंद होत होता. तिला माझी गरज लागेल, ती माझ्या मदतीचा स्वीकार करील, याकरितां तरी जिवंत राहिलें पाहिजे, अशा प्रकारच्या त्या वेड्या समजुतींत व आशेंत मी अगदीं चूर होऊन गेलों होतों. मी तें चिटोरें पुन्हां पुन्हां वाचलें. त्यांतील प्रत्येक शब्दाचें पारायण केलें व पत्राचें चुंबन

घेतलें. हळुंहळुं मी शांत होऊं लागलों व अर्धवट जागा व अर्धवट झोंपेंत अशी माझी स्थिती झाली.

अशा या अवस्थेंत मी तेथें बराच वेळ राहिलों असलों पाहिजे. मी एकदम भानावर आलों. तेव्हां अंधार पडत चालला होता. दारावर धक्का बसला काय ? मी अगदीं मन लावून ऐकत राहिलों. ही शंकाच नको. एकसारखा हळुहळु दारावर धक्का बसत होता. झुकांड्या जात मी दारापर्यंत गेलों. तेथेंच वाटेंत तो चिनी पोऱ्या उभा होता, तसल्या त्या अंधारांतसुद्धां त्याचे ते काळे डोळे, खरचटलेला परंतु अत्यंत निस्तेज असा चेहरा मला स्पष्ट दिसला.

" महाराज लवकर चला " एवढेंच तो म्हणाला. मी खालीं धांवलों. तो मुलगाही माझे मागोमाग आला. तेथें एक गाडी उभी होती. गाडीचें दार उघडें होतें. मी ताडकन् आंत जाऊन बसलों.

" काय रे, काय झालं ? " त्या गाडीवानानें गाडी हांकण्यास सुरुवात केली तेव्हां मी पोऱ्यास विचारलें.

त्या मुलानें मजकडे टकमक पाहिलें. परंतु तो एक शब्दही बोलला नाहीं. मी पुन्हां तोच प्रश्न विचारला, तरी तो आपला स्तब्धच ! पुन्हां याला ठोकावा इतका त्याचा मला राग आला

होता. परंतु त्याच्या स्वामिनीविषयींची त्याची निष्ठा याविषयीं मनांत विचार येऊन माझें अंतःकरण द्रवलें, म्हणून मी आत्मसंयमन केलें. त्याच्या मनांतूनच जर बोलावयाचें नसलें तर तो बोलणार तरी कोठून ? या विचारानें मी माझी समजूत करून घेतली.

गाडीवान् आपल्या तट्टाना चाबकाचे तडाखे मारमारून गाडी इतक्या जोरानें व बेफामपणें हांकत होता कीं, वाटेवरच्या लोकांना आपण गाडीखालीं चेंगरूं नये म्हणून पटापट उड्या मारून बाजूस व्हावें लागत होतें. आम्ही ज्या भागांत युरोपियन लोक राहतात तो भाग सोडून मले लोकांच्या गर्दीतून ज्या भागांत चिनी लोक राहतात तिकडे चाललों होतों. येथें आल्यावर ती गाडी एका अरुंद बोळांत शिरली व एका पडक्या घरासमोर उभी राहिली. ती जागा अत्यंत घाणेरडी असून तेथें एक लहानसें दुकान होतें. त्या दुकानांत उजेडाकरितां म्हणून एक बारीकशी मेणबत्ती मिणमिण जळत होती. त्या घराला जोडूनच एक हॉटेल होतें; व तें म्हणजे एक अफूचा अड्डा, कुंटणखाना, बदमाषाची खानावळ किंवा चोरून आणलेल्या वस्तु सांठविण्याची जागा असावी. बहुतेक मोठमोठाल्या शहरांत चिनी लोकांनीं चालविलेल्या अशा प्रकारच्या संस्था असतातच; त्यांतलाच हा प्रकार होय.

त्या पोऱ्यानें दार ठोठावलें. एक इंच अगर दोन इंच फट होईल इतकें दार उघडलें गेलें. मी अधिरतेनें गाडींतून खालीं उडी टाकली. आणि दाराला खांदा लावून तें धाडकन् उघडतों तो एक म्हातारी चिनी स्त्री एकदम किंचाळी फोडीत माझ्यासमोरून पळून गेली. मी व तो चिनी मुलगा दुसऱ्या दरवाजाशीं आलों आणि तो दरवाजा उघडून पाहतों तों त्या खोलींत अंधार असून ब्रँडी व रक्त यांचा डोकें उठविणारा दर्प येत होता. कोणीतरी आंत कण्हत होतें. त्या अंधरांत मला कांहींच दिसेना. तरीपण चांचपडत मी त्या आवाजाच्या धोरणानें चाललों.

× × × × ×

तो कथा सांगणारा गृहस्थ मध्येंच थांबला. पुन्हां जेव्हां त्यानें बोलण्यास सुरवात केली, तेव्हां तो हुंदके देत होता. तो कांहीं वेळानें आपली हकिकत पुढें सांगू लागला, "मी त्या आवाजाच्या रोखानें चांचपडत पुढें गेलों. तेथें एका घाणेरड्या चटईच्या तुकड्यावर ती स्त्री हुंदके देत कण्हत व दुःखानें अंगास आळोखेपिळोखे देत विव्हळत पडली होती. त्या खोलींत इतका अंधार होता कीं, तिचा चेहरा मला स्पष्ट दिसूं शकला नाहीं. मी माझा हात पुढें करून चांचपडत असतांना, तिचा हात माझे हातास लागला. तो मला चटका

बसण्याइतका धगधगीत वाटला. तिला भयंकर ताप भरलेला होता. काय झालें आहे ह्याची कल्पना येतांच माझ्या अंगावर शहारे उभे राहिले. जी मदत मी तिला नाकारली ती मदत घेण्याकरितां म्हणून ती असल्या या भागांत आली होती, आणि जी गुप्त गोष्ट ती मला सांगण्यास तयार नव्हती, त्याच गोष्टीकरितां या चिनी स्त्रीची मदत घेण्यास ती तयार झाली. माझ्यावर विश्वास ठेवण्याऐवजीं ती या थेरड्या चेटकिणीवर विश्वास ठेवण्यास तयार व्हावी आं? काय विचित्र दुर्दैवयोग आहे पहा! मी एखाद्या वेड्यापिशाप्रमाणें वर्तन केलें म्हणून आपला अपमान झाला असें वाटून मी जी मदत करण्यास अगदीं जीव टाकीत होतों, त्या मदतीचा अव्हेर करून, ती या असल्या विपरीत साहसास तयार व्हावी ना?"

दिवा आणा, म्हणून मी ओरडलों तेव्हां त्या किळसवाण्या थेरडीनें एक रॉकेल तेलाची धूर होणारी दिवटी आणली. नरडें पिरगळून तिचा जीव घ्यावा असें मला वाटलें, पण त्यापासून आतां उपयोग तरी काय? तिनें ती दिवटी एका टेबलावर ठेवली आणि त्या उजेडांत त्या इंग्लिश स्त्रीची ती अत्यंत केविलवाणी स्थिती माझ्या दृष्टीस पडली.

त्या देखाव्यानें माझें मन खाडकन् ताळ्यावर आलें. राग, मानापमान वगैरे सर्व भावना जेथल्यातेथें जिरून गेल्या.

मी एक डॉक्टर असून माझ्या ज्ञानाचा व कौशल्याचा उपयोग एका दुःख भोगणाऱ्या मानवी प्राण्यास देण्याची हीच वेळ आहे ही भावना माझ्या मनांत जागृत झाली. स्वतःस विसरून या स्त्रीस यांतून बरें केलेंच पाहिजे अशी मला उपरती झाली.

ज्या शरिरोपभोगाची मी नुकतीच तीव्र वासना धरली होती त्याच नग्न शरिरावरून मी निर्विकारमनानें हात फिरविला. आतां त्या शरिराकडे मी माझ्या ताब्यांत असलेल्या एका रोग्याचें शरीर या नात्यानें पाहूं लागलों. मृत्यूशीं झगडणारें तें शरीर विव्हळत तेथें पडलें होतें, माझ्या हातांस लागलेलें तिचें तें रक्त मला भयभीत करूं शकलें नाहीं. या कामांतील एक माहितगार या नात्यानें शांतपणानें मला त्या गोष्टीचा विचार करून औषधोपचार करणें भाग होतें.

कांहींतरी अद्भुत दैवी चमत्काराशिवाय ती स्त्री यांतून वाचत नाहीं अशी माझी लवकरच खात्री झाली. तिला येथें मिळालेली ट्रीटमेंट इतक्या वाईट स्वरूपाची होती कीं, रक्त-स्रावामुळें तिच्या शरिरांतील शक्ती ओसरत चालली होती. तो रक्तस्राव थांबविण्याकरितां असल्या या घाणेरड्या खोलाड्यांत मी तरी काय प्रयत्न करणार. ? ज्या ज्या वस्तूकडे पहावें किंवा जी जी वस्तू हातांत घ्यावी ती घाणेरडी होती. एखादें स्वच्छ भांडें किंवा स्वच्छ पाणी मिळेल तर शपथ ! " तुम्हाला येथून

तावडतोब हॉस्पिटलमध्यें नेलें पाहिजे" मी म्हणालों. या माझ्या बोलण्यानें तिच्या अन्तःकरणास जास्त वेदना झाल्या असें दिसलें व ती अधिकच विव्हळू लागली.

"नको, नको, त्यापेक्षां मी मेलेली बरी. ही गोष्ट कोणासही कळतां कामा नये. चला, मला घरीं घेऊन चला" ती मोठ्या कष्टानें म्हणाली.

तिच्या म्हणण्याचा अर्थ माझ्या चटकन् ध्यानांत आला. आयुष्यापेक्षां अब्रूची चाड तिला जास्त वाटली. मी तिच्या म्हणण्याप्रमाणें वागण्याचें कबूल केलें. त्या चिनी पोऱ्यानें झटकन् जाऊन एक डोली आणली. आम्हीं दोघांनीं तिला उचलून त्यांत ठेविली. त्या अंधाऱ्या रात्रींतून तसल्या त्या अर्धमेल्या स्थितींत तिला घरीं आणली. घाबरलेल्या नोकरांच्या उद्गारांना व प्रश्नांना कांहींएक उत्तर न देतां आम्ही तिला तिच्या खोलींत नेऊन ठेविलें.

आतां मात्र तिच्या शरिराचा मृत्यूशीं खरा झगडा सुरू झाला.

× × × × ×

इतकें बोलून त्या गृहस्थानें माझा हात धरला. त्यामुळें मला फारच आश्चर्य वाटलें. त्याचा चेहरा माझ्या इतक्या

जवळ आला कीं, त्या चांदण्याच्या प्रकाशांत त्याचे ते शुभ्र परन्तु भयानें विकट दिसणारे दांत व चष्म्याच्या कांचा चकाकतांना मला दिसल्या. तो इतक्या कळकळीनें व दुःखानें बोलत होता कीं, त्याचा तो आवाज मला एखाद्या आरोळ्या देणाऱ्या माणसाच्या आवाजाप्रमाणें वाटला. तो पुढें म्हणाला, " तुम्हाला सूर्यप्रकाशांत पाहण्याचें किंवा तुमची ओळख करून घेण्याचें भाग्य मला अजून लाभलें नाहीं. करमणुकीकरितां जगाचा प्रवास करणारे तुम्ही एक प्रवासी आहांत. कधीं कोणास मरतांना तुम्ही पाहिलें आहे काय ? मृत्यूचें दुःख व त्या-वेळेस हातापायास बसणारे ते हिसके व गचके व शेवटची ती घरघर तुम्ही प्रत्यक्ष कधीं ऐकली आहे काय ? तसेंच सतेज चमकणाऱ्या डोळ्यांच्या मरणसमयीं कवड्या होतांनां व त्यानंतरचें तें भीतिदायक दृश्य तुम्हीं कधी पाहिलें आहे काय ? तुमच्यासारख्या चैनीकरितां प्रवास करणाऱ्या इसमास अशा या देखाव्यांचा परिचय कोठून होणार ? "

डॉक्टर या नात्यानें हॉस्पिटलमध्यें काम करीत असतांना असें पुष्कळ प्रसंग मी पाहिले आहेत. परंतु अत्यंत पूर्णपणें असा त्याचा अनुभव मला एकदांच आला आहे. मरणाऱ्या इसमाबरोबर मृत्यूच्या यातना मी एकदांच भोगल्या आहेत कांहीं दिवसापूर्वी त्या रात्रीं त्या स्त्रीचा रक्तस्राव कसा थांबवावा

व तिच्या अंगांत भरलेला तो प्रखर ताप नाहींसा होऊन मृत्युपासून तिची मुक्तता कशी करतां येईल याविषयीं विचा करीत असतांना तसल्या यातना मला प्रत्यक्ष अनुभवण्या मिळाल्या. वैद्यकीय शास्त्रांत व धंद्यांत वाकबगार अश माझ्यासारख्या डॉक्टरानें पेशंट्ला मदत करणें हें आद्यकर्त आहे असें समजत असतांनासुद्धां एखाद्या मरणाऱ्या रोग्याच्य बिछान्याजवळ किंकर्तव्यमूढ होऊन, कपाळावर हात ठेवू स्वस्थ बसावयास लागावें यासारखी दुसरी दुःखकारक गो ती कोणती ? शेवटीं आखडत असलेली नाडी पाहण्याच पाळी येऊन, हातपाय ताणल्यासारखें मला स्वस्थ बसा लागले. कोणाचीहि मदत मला घेतां येईना, किंवा ज्या ठिकाण कांहीं उपचार वगैरे करतां येतील अशा हॉस्पिटलमध्यें तिला नेतां येईना. नुसतें स्वस्थ बसून ती स्त्री मरत असतांन पाहण्यापलीकडे मला कांहींच करतां येईना.

हें सर्व तुम्हाला समजणें शक्य आहे काय ? अश सारख्या एखाद्या मनुष्यास मरतांनां पाहूनसुद्धां दुसरा मनुष कसा जिवंत राहूं शकतो हेंच मला कळत नाहीं. दुसऱ्य दिवशीं तो नेहमीप्रमाणें उठून नित्यकृत्यें कशी करूं शकतो जें घडून येण्याकरितां मी वाटेल तें दिलें असतें तें तर घडू येणें शक्य नाहीं. सर्वस्वी तें माझ्या शक्तीच्या बाहेरचं

होतें. कांहीं असलें तरी हीं सर्व दु:खें पाहून शेवटीं पुन्हां आपली दिनचर्या चालूंच आहे, याचेंच मला राहूनराहून आश्चर्य वाटतें.

आतां आणखी निराळ्याच एका दुःखास सुरुवात झाली. मी तिचें दु:ख कमी होण्याकरितां म्हणून तिला मॉर्फियमचें इंजेक्शन दिलें होतें. त्यामुळें ती स्वस्थ पडून होती. तो चिनी पोरगा तेथें जमिनीवर मांडी घालून बसला होता व डोळे मिटून तो आपल्या भाषेंत परमेश्वराची कांहीं प्रार्थना पुटपुटत होता. ज्यावेळीं मी त्याच्याकडे पाहिलें त्यावेळीं एखाद्या लाचार कुत्र्याप्रमाणें दीनवाण्या मुद्रेनें मी त्या संकटांतून त्या स्त्रीस वांचवावें अशा दृष्टीनें तो माझ्याकडे पहात असे. परमेश्वराची प्रार्थना करीत असतांना तो आपले हात उंच करी व विनवणीच्या मुद्रेनें माझ्याकडे पुनः पुन्हां पाही परंतु त्या स्त्रीच्या बाबतींत आतां कांहींच करतां येणें शक्य नव्हतें. निरुपद्रवी कीटकांपेक्षांहि मी आगतिक झालों होतों हें त्या बिचाऱ्याला काय बरें माहित ?

ती स्त्री तर आतां एकएक पळ मोजीत होती. त्या पोऱ्याची प्रार्थना तशीच पुढें चालू होती. माझें डॉक्टरकींतील कौशल्य तिला वांचवूं शकेल अशी त्याची समजूत झाली होती व म्हणून पुनः पुन्हां लाचारपणानें तो मजकडे पाही. परंतु

त्यामुळें मला अतिशय वेदना होत होत्या. मला त्याचा थोडासा रागहि आला परंतु त्या स्त्रीचें रहस्य व तिजविषयीं वाटणारी आपुलकी यामुळें आम्ही एकमेकांस बांधले गेलों होतों.

पहारा करणाऱ्या एखाद्या कुत्र्याप्रमाणें तो तेथें बसून राहिला होता व मला जर कांहीं लागलें तर तशाही स्थितींत तो तें मोठ्या त्वरेनें आणून देई. आपल्या स्वामिनीचे प्राण वांचविण्यासाठीं तो आपले रक्तही द्यावयास तयार झाला असता. मला त्याविषयीं बिलकूल शंका नव्हती. मींसुद्धां माझें रक्त देण्यास तयार होतों परंतु तिचें अंगांत नवीन रक्त भरण्यासाठीं लागणारी शस्त्रक्रियेची साधनें जरी मजजवळ असती तरी त्यांचा कांहीं उपयोग नव्हता. कारण तिचा होणारा रक्तस्त्राव थांबविण्यास कांहींही योजना करणें आतां शक्य नव्हतें. तसें करण्यानें तिच्या दुःखांत मात्र भर पडली असती. त्या स्त्रीची मोहनी इतकी प्रबल होती कीं आम्ही दोघेहि तिज-करितां मरावयास तयार होतों परंतु रक्तस्त्रावामुळें येणाऱ्या मरणापासून मात्र मला तिला वाचवितां येत नव्हतें. उजाडण्या-च्या सुमारास तिची गुंगी जाऊन ती थोडीशीं शुद्धीवर आली. तिनें आपलें नेत्र उघडले. त्या डोळ्यांतील तें पूर्वीचें मानाचें व आढ्यतेचें तेज पार लोपून गेलें होतें व अंगांतील ज्वरामुळें ते थोडेसे लाल दिसत होते. तिनें एकदां सभोंवार दृष्टी फेंकली. मला पाहतांच ती क्षणभर गोंधळली व हा परका गृहस्थ कोण

हें आठवत असल्यासारखी तिची मुद्रा झाली. लवकरच तिची स्मृती जागृत झाली. तशाही स्थितींत किंचित् द्वेषभावानें तिनें आपला हात हालविला. स्वतः तिला जर शक्ति असती तर तिनें कदाचित् मला हांकलूनहि दिलें असते. कांहीं वेळानें तिनें माझ्याकडे शांतदृष्टीनें पाहिलें. तिला श्वासोच्छ्वास करण्या-सहि पराकाष्टेचा त्रास पडत होता. तिनें बोलण्याचाहि प्रयत्न केला. तिच्या मनांतून उठून बसावें असें होतें परंतु ती फारच अशक्त झाली होती. तिनें उठून बसूं नये असें खुणावून मी तिच्यापुढें इतका ओणवा झालों कीं, तिनें हलु उच्चारलेला शब्दसुद्धां मला ऐकूं यावा. तिनें माझ्याकडे केंविलवाण्यादृष्टीनें पाहिलें. हलुहलु तिचें ओंठ हलूं लागले व खालील शब्द अस्पष्ट असें बाहेर पडले. " ही गोष्ट कोणाच्याही कानीं जातां कामा नये. अगदीं कसलाहि मागमूस लागतां कामा नये. "

" नाहीं, यांतील कांहींएक कोणाला समजणार नाहीं " मी आत्मविश्वासानें म्हणालों.

इतकें आश्वासन दिलें तरीसुद्धां तिच्या मनाची व्याकुळता कमी झालेली दिसली नाहीं. मोठ्या प्रयासानें ती पुन्हां म्हणाली, " हें कोणास कळणार नाहीं याविषयीं शपथ घेऊन मला वचन द्या. "

मी गंभीरपणानें मान वरती केली व म्हणालों "हें घ्या, त्याबद्दल मी तुम्हास वचन देतों." तिच्या क्षीण हातावर मी आपला हात ठेवला.

अशाही मरणासन्न स्थितींत तिनें कृतज्ञतेनें माझ्याकडे पाहिलें. मी इतका तिच्या दुःखास कारणीभूत झालों असतांही तिनें कृतज्ञतेनें थोडेसें स्मित केलें. तिला पुन्हां कांहीं बोलावेसें वाटलें पण तिच्यांत मुळींच त्राण उरला नव्हता. नंतर डोळे मिटून ती परत मागें पडून राहिली. उगवत्या सूर्याचे कोमल किरण त्या खोलींत येण्यापूर्वींच तिच्या प्राणसूर्याचा शेवटचा किरण मावळला होता.

× × × × × ×

त्यानंतर बराच वेळ तो कथानक सांगणारा गृहस्थ कांहींच बोलला नाहीं. तो अगदीं श्रांत झाल्यासारखा दिसला. हळुहळु तारे मावळण्यास सुरुवात झाली होती त्यामुळें प्रकाश अंधुक होत चालला व उष्णकटिबंधांत झटकन् होणाऱ्या पहाटेची साक्ष थंड असा मंजूळ वाहणारा वारा देत होता. थोड्याच वेळानें तो गृहस्थ मला बऱ्याच स्पष्टपणे दिसू लागला. त्यानें आपली टोपी काढली असल्यामुळें त्याची मुखचर्या मला स्पष्टपणें दिसत होती. तिजवर दुःखाची छटा पसरलेली होती. थोड्याशा कुतू-

हलबुद्धीनें त्यानें आपल्या चष्म्यांतून माझ्याकडे पाहिलें. ज्याच्याजवळ आपण आपलें अंतःकरण आतांपर्यंत उघड करून सांगितले तो गृहस्थ आहे तरी कसा हें जाणण्याची त्याला इच्छा दिसली. क्षुब्ध व खिन्न मनःस्थितींत त्यानें पुन्हां आपल्या गोष्टीस सुरवात केली.

" ती इंग्लिश स्त्री वारली, तेव्हां अर्थातच तिच्यासंबधीं सर्व गोष्ट संपली. परंतु माझ्यासंबंधीं अजून पुष्कळच गोष्टी सांगावयाच्या आहेत. त्या परक्या घरांत त्या प्रेताजवळ मी एकटाच बसलों होतों. प्रत्येक गांवांत विनाकारण कंड्या कशा उठतात हें आपणांस माहितच आहे आणि मी तर तिला वचन देऊन चुकलों होतों कीं, या गोष्टीबद्दल कोठेंही परिस्फुटता करणार नाहीं म्हणून ! या परिस्थितीचा आपणच विचार करा. वसाहतींतील अत्यंत उच्च अशा समाजांत ती स्त्री वावरत होती. बाह्यतः तरी ती अत्यंत सुदृढ दिसत होती. आदल्या दिवशीं गव्हर्नमेंट् हाऊसवर नृत्यसमारंभासाठीं ती हजरही होती. आणि तीच स्त्री आज मेलीसुद्धां व यासंबंधीं माहिती असलेला व मरणसमयीं तिचेजवळ असलेला असा मीच काय तो एक डॉक्टर. याच डॉक्टरनें व तिच्या एका नोकरानें मिळून तिला रात्रीं अंधारांतून डोलींत घालून घरीं आणलेली व याविषयीं मात्र कोणास कांहीं सांगितलें नाहीं, ही सर्व बातमी तासादोन

तासांत सर्व गांवभर पसरेल. परगांवाहून आलेला मी डॉक्टर, त्यानें काय केलें अन् काय केले नाहीं, तसेंच त्या स्त्रीच्या मृत्यूचें कारण काय, वगैरे सर्व गोष्टी सांगण्याची पाळी माझ्या एकट्यावरच येईल. या जबाबदारींत वाटेकरी होण्याकरितां मी इतर कोणाही डॉक्टरास कां बरें बोलावलें नाहीं ? तसें केलें असतें तर बरें नसतें कां झालें ? आतां पुढें काय होणार याची कल्पना मला आलीच. त्या चिनी पोऱ्याशिवाय मला दुसरा कोणी मदतनीस नव्हता. कांहीं असलें तरी तो अत्यंत विश्वासू होता. त्या स्त्रीच्या मृत्यु-बरोबर सर्व गोष्टी संपल्या असें नसून त्यानंतरच्या परिस्थितीस टक्कर देणें इष्ट व अवश्य होतें, हेंही तो जाणून होता. मी त्याला म्हणालों, " तुझ्या धनिणीची शेवटची इच्छा अशी आहे कीं, जें कांहीं घडलें तें कोणासही कळतां कामा नये, हें तुला ठाऊकच आहे ! " " होय, साहेब. " तो म्हणाला. त्याच्यावर विश्वास ठेवण्यास कांहींच हरकत नव्हती, हें मला माहित होतें.

त्यानें जमिनीवर पडलेले रक्ताचे डाग धुवून काढले व सर्व जिनसा जेथल्या तेथें ठेवल्या. त्याच्या धैर्याचें मला खरो-खरच आश्चर्य वाटलें. पुढील सर्व गोष्टी करण्यास माझ्यांत तरी इतकें धैर्य व दम कसा आला, हेंच मला समजत नाहीं. मला वाटतें एखादी अनिष्ट गोष्ट घडल्यावर तिच्या उरल्यासुरल्या

पूर्ततेसाठीं मनुष्य जेव्हां शेवटची धडपड करतो, तेव्हां त्याच्यांत एक प्रकारचा क्रूर निश्चयीपणा व बेफाम धैर्य येते. मी ज्या दुःखकारक गोष्टीची तड लावण्यासाठीं येथें धडधड करीत होतों, ती म्हटली म्हणजे तिनें सर्व गोष्टी गुप्त राखण्याकरितां माझ्यावर लादलेली कामगिरी होय. तिच्या मृत्यूबद्दल काय कारण सांगावयाचे, तें मी माझ्या स्वतःच्या मनाशीं योजून ठेविलें होतें आणि जो कोणी मला विचारील त्याला तें मोठ्या गंभीरपणानें ठासून सांगावयाचेंही मी ठरविलें होतें. ऊष्णकटिबंधांतील कांहींकांहीं रोग असें असतात की, त्यामुळें मनुष्य एकदम तडकाफडकी मरतो. माझ्यासारख्या डॉक्टरनें अधिकारयुक्त वाणीनें सांगितलेलें असल्या प्रकारचें कारण कोणास खोटें वाटणार आहे ? ती स्त्री आजारी झाल्यावर तिनें तिच्या चिनी नोकरांस मला बोलावून आणण्यास सांगितलें. परंतु इतरेजनांना सांगावयाच्या गोष्टी ठरवीत असतां मला जी खरी भीति वाटली ती तेथील मुख्य सर्जनची. कारण त्या स्त्रीचें प्रेत पुरण्यापूर्वी त्या प्रेताची त्यांचेकडून तपासणी होणार.

दोन दिवसांत म्हणजे शनिवारी तिचा नवरासुद्धां परत येणार. प्रेताचा उत्तरविधी तावडतोब झाला पाहिजे असा तर इकडील प्रांतांतील रिवाज आहे. परंतु त्याकरितां लागणाऱ्या

सर्टिफिकिटावर माझी सही चालणार नसून मुख्य सर्जनची सही लागणार. नऊ वाजतां सर्जनसाहेब आले. अर्थातच मी बोलावणें पाठविलें होते. ते माझ्यापेक्षां वरच्या रांकेचे हुद्देदार होते. आणि व्हाइस रेसिडेंटाचा मोडलेला पाय मी बसविल्यापासून माझा तेथें जो बोलबाला झाला त्यामुळें ते माझा हेवा करीत असत. त्या इंग्रज स्त्रीनेंसुद्धां त्यांचेविषयीं तिरस्कारयुक्त शब्द काढले होते. कारण तिच्या म्हणण्याप्रमाणें ते ब्रिज खेळण्यांत जास्त पटाईत होते. तसेंच ऑफिसनियमान्वयें माझ्या बदलीसंबंधाचा अर्जही त्यांच्याचमार्फत जावयाचा होता. व्हाइस-रेसिडेंटानीं अर्थातच त्याविषयीं उल्लेख केला होता.

त्या दिवशीं सकाळी सर्जनसाहेब भेटतांच त्यांच्या माझ्याविषयींच्या वैरभावाची कल्पना मला आली. परंतु त्यामुळें माझें धैर्य मात्र द्विगुणित झालें. जवळच्याच खोलींत ते वाट पहात होते. मी त्यांचेजवळ गेलों. त्यांनीं तिचें नांव घेऊन विचारलें. " ही स्त्री केव्हां वारली ? "

" आज सकाळीं ६ वाजतां " मी म्हणालों.

" त्यांनीं तुम्हाला केव्हां बोलावणें पाठविलें ? " सर्जननीं विचारलें.

" काल रात्रीं " मी उत्तर दिलें.

" बाईचा नेहमींचा डॉक्टर मी आहे हें तुम्हांस माहित आहे काय ? " त्यांनीं जोरांत विचारलें.

" होय " मी शांतपणें उत्तर दिलें.

" मग त्यावेळीं तुम्ही मला कां नाहीं बोलावणें धाडलें ? " ते म्हणाले.

" तसें करण्यास वेळ नव्हता. शिवाय मृत स्त्रीनें सर्व मी एकट्यानेंच करावें अशी इच्छा दर्शविली. किंबहुना दुसऱ्या कोणाही डॉक्टरास बोलाविण्यास त्यांनीं मला मनाई केली. " सर्जनसाहेब स्थिर व रागीट मुद्रेनें पाहूं लागले. तरी पण राग थोडासा आवरून बेपर्वाईनें ते म्हणाले, " जोपर्यंत ती जिवंत होती तोपर्यंत माझ्या मदतीशिवाय सर्व गोष्टी तुम्हास करतां आल्या. आतां तिच्या मृत्यूनंतर तुम्ही मला बोलाविलेत. त्यांत तुम्ही सरकारी अधिकारी या नात्यानें आपलें कर्तव्य केलेंत. प्रेताची तपासणी करून मृत्यूचें कारण काय हें अधिकारी या नात्यानें मला ठरविलें पाहिजे. " सर्जनसाहेब म्हणाले. मी त्यावर कांहींच उत्तर दिलें नाहीं. तिचें प्रेत ज्या खोलींत ठेविलें होतें तेथें मी त्यांस घेऊन गेलों. आम्ही त्या खोलींत पाय ठेवितों व ते आतां प्रेताला स्पर्श करणार इतक्यांत मी म्हणालों, " मृत्यूचें कारण काय हें निश्चित करण्यापेक्षां मृत्यूला

एखादें कारण शोधून काढणें जरूर आहे. एका अजाण, चिनी सुईणीनें गर्भपाताकारितां केलेल्या शस्त्रक्रियेच्या परिणामापासून आपणांस सोडवावें म्हणून बाईनीं मला बोलावणें पाठविलें होतें. त्यापासून तिचा जीव बचावणें अशक्य होतें. परंतु तिच्या अब्रूचें रक्षण करीन असें मी तिला वचन दिलें आहे व या बाबतींत मला तुमची मदत पाहिजे."

त्यांनीं मजकडे आश्चर्यानें पाहिलें. "म्हणजे गुन्हा लपविण्याकरितां माझ्यासारख्या या प्रांताच्या मुख्य सर्जननें तुम्हास मदत करावी अशीच तुमची इच्छा ना?"

"होय, हेंच मला तुमच्यापासून पाहिजे" मी म्हणालों. ते तिरस्कारानें म्हणाले, "जो गुन्हा तुम्ही केला आहे तो लपवून ठेवण्याकरितां मी तुम्हास मदत कशी करावी?"

मी तुम्हास अगोदरच सांगितलें आहे व तेंच पुन्हां सांगतो. "तुम्ही ज्याला गुन्हा म्हणतां तो मी केलेला नसून दुसऱ्या कोणीतरी केलेला आहे. आणि माझा व या स्त्रीचा संबंध म्हणजे इतकाच कीं, त्यांनीं स्वतः केलेल्या अविचाराच्या कृत्याच्या परिणामापासून मी त्यांची मुक्तता करण्यांत मदत करावी एवढाच आहे. मी जर गुन्हेगार असतो तर या क्षणापर्यंत जिवंतच राहिलों नसतों. ह्या बाईना स्वतःच

केलेल्या कृत्याचा परिणाम पूर्णपणें भोगावा लागला आहे. आणि ज्या कोणी हा गर्भपात करण्याचा प्रयत्न केला असेल, त्याचा एक तऱ्हेनें पाहतां कांहींच संबंध नाहीं. बरें त्या गुन्हेगारास शिक्षा करावयाची म्हटलें तर बाईच्या अब्रूला काळोखी फासली जाणार आणि तें मला खपणार नाहीं."

"काय म्हणतां ? तुम्हांस तें खपणार नाहीं ? जणुंकाय माझ्यावरचे अधिकारी अशा ऐटीनें तुम्हीं बोलता. मला हुकुम करण्याचा तुम्हास धीर तरी कसा होतो ? तुम्ही राहात असलेल्या आडबाजूच्या कोपऱ्यांतून ज्याअर्थी तुम्हाला इतक्या लांबवर बोलावून आणलें त्याअर्थी येथें कांहींतरी घोटाळा असला पाहिजे, असा मी प्रथमच तर्क केला होता. तुम्ही येथें येऊन गडबडगुंडा करण्यास चांगलीच सुरुवात केली आहे म्हणावयाची. माझें कर्तव्य एवढेंच कीं, झालेल्या गोष्टीची पूर्णपणें चवकशी करून मला येथें जें जें कांहीं दिसेल व सांपडेल त्याचा यथातथ्य अहवाल सरकारकडे सादर करणें, हें होय. एखाद्या खोट्या सर्टिफिकीटावर माझी मी सही करणार नाहीं. त्याजविषयीं आपण खात्री बाळगा." सर्जनसाहेबांनीं उत्तर दिलें.

मी तर अगदी स्तंभितच झालों व निश्चयानें म्हणालों, "यावेळेस तरी तुम्हास तसें केलेंच पाहिजे. तुम्ही तसें न कराल तर येथून जिवंत परत जाण्याची तुम्हास आशाच नको."

मी खिशांत हात घातला. खिशांत पिस्तूल नव्हतें. ( मी तें माझ्या हॉटेलमधील खोलींतच विसरलों होतों. ) परंतु नुसत्या दटावणीनेंच काम झालें. भीतिनें सर्जनसाहेब थोडे मार्गे हटले. मी एक पाऊल पुढें जाऊन धमकीच्या परंतु थोड्याशा समेटाच्या स्वरानें म्हणालों, " असं पहा, इतक्या थराला गोष्टी नेण्याची माझी खरोखरच इच्छा नाहीं. परंतु या बाबतींत तुमच्या काय किंवा माझ्या काय आयुष्याची मला मुळीच किंमत नाहीं, हें तुम्हांस कळून चुकलेंच असेल. माझा तर आयुष्याशीं संबंध इतका तुटलेला आहे कीं, जगांत फक्त एकाच गोष्टीची मला आतां पर्वा उरली आहे आणि ती म्हणजे या मृतस्त्रीला ती कशानें मेली याविषयींचें कारण गुप्त ठेवण्याचें दिलेलें वचन पाळणें ही होय. मी तुम्हांस अशी ग्वाही देतों कीं, ही स्त्री उष्णकटिबंधांत येणाऱ्या तापानें एकाएकीं आजारी पडून हार्टफेल्युअरनें मरण पावली. ( मला वाटतें असलें एखादें कारण सयुक्तिक दिसेल. ) अशाविषयींचें सार्टीफिकिट जर तुम्हीं दिलें तर पुढच्या आठवड्यांतच हा प्रांत कायमचा सोडून मी चालता होईन. एवढ्यानेंच तुमचे समाधान होत नसल्यास मी तुम्हांस असेंही आश्वासन देतों कीं, या स्त्रीचा अंत्यविधी उरकतांच मी स्वतःस गोळी घालून ठार करीन. म्हणजे मग तरी तुमचें समाधान होईल···कां नाहीं ?···झालेंच पाहिजें."

माझा आवाज, माझा त्या वेळचा सर्वच रोख त्यांना मोठा भीतिदायक वाटला असला पाहिजे. कारण तावडतोब ते बरेच नरम झाले. मी ज्याज्या वेळीं एखादें पाऊल पुढें टाकी, त्यात्या वेळीं ते मागें हटत असत. ज्याप्रमाणें एखादा बेहोष वेडापिसा बनलेला मनुष्य हातांत नागवी तलवार घेऊन ती परजवीत पळत सुटला म्हणजे त्याच्यापुढें सर्व माणसें भीतिनें बाजूला होतात, त्याचप्रमाणें सर्जनसाहेब भीतिनें मागें हटत असत. त्यांचा चेहरा व आवाज दोन्ही बदलली. बाह्यत: निग्रही पण पडलेल्या आवाजानें ते म्हणाले, “ खोट्या सर्टिफिकिटावर मी जन्मांत सही केली नाहीं. आतां तुम्ही म्हणतां त्याप्रमाणें जर मी सही केली तर त्यांत मोठासा प्रश्न नाहीं म्हणा. तरीपण अशाप्रकारचें कांहीं करणें बरोबर नाहीं असें मला वाटतें. ”

“ बरोबर आहे. तुम्ही म्हणतां त्याचप्रमाणें माझेंही मत आहे. परंतु ही स्पेशल् केस आहे. कारण एखाद्या गोष्टी-विषयीचें सत्य सांगून एका जिवंत मनुष्यास भयंकर यातना होत असतील व या मृत स्त्रीच्या अब्रूचे धिंडवडे निघत असतील तर मी म्हणतों थोडेसें खोटें सर्टिफिकिट देण्यास काय हरकत आहे ? ” मी म्हणालों.

त्यांनीं संमतीदर्शक मान हलविली. आम्ही दोघेंही टेबलाजवळ बसलों. एकमेकांची समजूत पटल्यामुळें जरूर असलेलें खोटें सर्टिफिकिट तयार केलें. दुसऱ्या दिवशीं वर्तमानपत्रांत या सर्व प्रकरणाविषयीं जो मजकूर प्रसिद्ध झाला, त्याला मुख्य आधार म्हणजे हेंच सर्टिफिकिट होय. तदनंतर सर्जनसाहेब उभे राहिले व मजकडे भेदक दृष्टीनें पाहून त्यांनीं मला विचारिलें, " मग काय, पुढच्या बोटीनें तुम्ही यूरोपला जाणार होय ना ? "

" अर्थात् ! तसें मी तुम्हास वचनच दिलें आहे. " मी म्हणालों.

सर्जनसाहेब तसेंच रोखून माझ्याकडे पहात उभे राहिले व स्वतःच्या मनांत चाललेला गोंधळ लपविण्याचा प्रयत्न करीत त्यांनीं मला पुढील जास्त माहिती सांगितली.

" प्रवासाहून परत आल्यानंतर ह्या मृत स्त्रीचे यजमान आपल्या पत्निसमवेत यूरोपकडे जाणार होते. गरीब बिचाऱ्याला आपल्या नातेवाईकांना भेटविण्यासाठीं आपल्या पत्नीचें प्रेत युरोपास न्यावेसें वाटेल. श्रीमंतांना अशाप्रकारच्या हौशी असतात. मी कॉफिन तयार करण्यास ताबडतोब आर्डर देतों, व त्याच्याभोंवतीं एक शिशाचा पत्रा मारावयास सांगतों, म्हणजे प्रेतास

घाण येणार नाहीं व त्या कॉफिनला पुढें सील वगैरे करण्यास बरें पडेल. असल्या ह्या उष्ण हवेच्या प्रदेशांत ते येईपर्यंत प्रेत ठेवणें शक्य नाहीं. आणि आपण थोडीशीं घाई केली असे जरी त्यांना वाटले तरी तसें म्हणण्यास ते धजणार नाहींत. कांहीं झालें तरी ते व्यापारी असून आपण सरकारी अधिकारी आहोंत. शिवाय असें करण्यानें आपण त्यांना व्यर्थ होणारा त्रास वांचवीतच आहोंत. ”

जो गृहस्थ कांहीं क्षणापूर्वीं माझा कट्टा शत्रू होता, तोंच आतां माझा मित्र बनून मला सहाय्य करीत होता. कांहीं असलें तरी थोड्याच दिवसांत मी त्याच्या मार्गांतून कायमचाच दूर होणार होतों व म्हणून तो आतां स्वसंरक्षणाकरितां हें सर्व इतक्या पाल्हाळानें सांगत होता. त्यानंतर सर्जनसाहेबांनीं माझ्याशीं स्नेहपूर्वक हस्तांदोलन केलें त्यामुळें मात्र मी फारच चकित झालों.

सर्जनसाहेब माझ्याकडे विशेष रेखीव नजरेनें पाहून म्हणाले, “ थोड्याच दिवसांत पुन्हां तुम्हाला बरें वाटेल. ”

म्हणजे, यांचें म्हणणें तरी काय ? मी काय आजारी होतों कां वेडा बनलों होतों ? मोठ्या अदबीनें मी दरवाजा उघडला व सर्जनसाहेबांना निरोप दिला. यानंतर मात्र माझ्यांत अवशिष्ट

असलेली सर्व शक्ती एकाएकीं लुप्त झाली असें मला वाटलें. ती सर्व खोली माझ्याभोंवती फिरत आहे असा मला भास झाला. ज्याप्रमाणें एखाद्या खुनी व मोकाट पळत असलेल्या मले मनुष्यास गोळी घातली म्हणजे तो जसा मटकन् मरुन खालीं पडतो त्याप्रमाणें मी त्या तिच्या बिछान्याजवळ एकदम खालीं पडलों.

× × × × ×

तो कथा सांगणारा गृहस्थ थोडा थांबला. नंतर पुन्हां त्यानें हकिकत सांगण्यास सुरुवात केली.

" मी तेथें त्या जमिनीवर तसा किती वेळ पडून राहिलों होतों हें मला सांगतां येत नाहीं. त्या खोलींत आवाज व हालचाल सुरु झाली. मी वर पाहिलें. तो चिनी पोऱ्या मजसमोर उभा होता. तो म्हणाला " साहेब, कोणीतरी आलें आहे. "

" तू कोणासही आंत सोडतां कामा नये " मी म्हणालों.

" पण धनीसाहेब " तो अडखळला. त्याला कांहींतरी दुःख होत असलें पाहिजे खास !

" कोण आहे रे ? " मी विचारिलें.

तो चिनी पोऱ्या थरथर कांपत होता. कोण आले होते त्याचें नांव त्यानें सांगितलें नाहीं. तो एवढेंच म्हणाला, "ते गृहस्थ !"

यापेक्षां जास्त स्पष्टीकरण करण्याची कांहींच आवश्यकता नव्हती. तो काय म्हणतो तें मला तावडतोब समजलें. ज्या अज्ञात मनुष्याच्या अस्तित्वाचा विचारही माझ्या डोक्यांतून गेला होता, त्या मनुष्यास, पोऱ्यानें "ते गृहस्थ" हे शद्ब उच्चारतांच, पाहण्यास मी अत्यंत आतुर झालों. तुम्हाला कदाचित् हें कसेंसेंच वाटेल परंतु त्या इंग्लिश स्त्रीनें प्रथमतः ती माझ्याकडे कशाकरितां आली आहे, तें सांगितल्यापासून व मी तिला केलेल्या अमानुष मागणीचा तिनें अव्हेर केल्या-पासून सदरहू गृहस्थासंबंधींचे विचार माझ्या डोक्यांतून नाहींसे झाले होते. त्यानंतर घडलेल्या आणीबाणीच्या प्रसंगासंबंधींच्या काळजींत व गडबडींत ह्या सर्व प्रकरणाशीं आणखी एका गृहस्थाचा, त्या इंग्लीश स्त्रीच्या प्रियकराचा, मी जे तिच्या-जवळ मागत होतों तीच गोष्ट त्याच्यावर फिदा होऊन तिनें ज्याला दिली त्या गृहस्थाचा, संबंध असला पाहिजे हा विचारच माझ्या डोक्यांत आला नाहीं. अदल्या दिवसापर्यंत मी त्याचा अत्यंत द्वेष केला असेल किंवा त्याला उभा चिरावा असेही विचार माझ्या डोक्यांत आले असतील परंतु आतां त्याला पाहण्यास मी उत्सुक झालों होतों. मी त्याच्यावर

प्रेम करू लागलों होतों ·········कारण तिनें त्याच्यावर प्रेम केलें होतें.

एका चुटकीसरशीं मी शेजारच्या खोलींत आलों. एक सुंदर केसांचा पोरसवदा तरुण अधिकारी तेथें लाजेनें व गोंधळलेल्या मनःस्थितींत उभा होता. तो सडपातळ असून त्याचा चेहरा निस्तेज दिसत होता. त्यानें मला सॅल्यूट करण्याकरितां हात वर उचलला परंतु त्याचा हात कांपत होता. त्या स्त्रीचा प्रियकर कसा असावा ह्याविषयीं मी जी कल्पना बांधली असती त्या कल्पनेप्रमाणें तो असलेला दिसला. त्यानें तिला आपल्या प्रेमपाशांत गुरफटलें नसून, ती होऊनच सर्वस्वी त्याच्या आधीन झाली असली पाहिजे; असा विचार त्याला पाहिल्याबरोबर माझ्या मनांत आला.

लज्जेनें मान खालीं घालून तो माझ्यासमोर उभा होता. मला पाहून तो जास्तच गोंधळला. त्यानें आपलें तोंड थोडेसें फिरवलें व तो आतां अगदीं रडण्याच्या बेताला आला.

शेवटीं तो म्हणाला, “ घरांत बळेंच घुसण्याची माझी मुळींच इच्छा नाहीं परंतु तिला पुन्हां पहावें, एवढ्याच हेतूनें मी आलों आहे.”

मी काय करीत आहे ह्याची मुळींच कल्पना न येतां मी त्या तरुण ऑफिसराच्या खांद्यावर हात ठेवला व त्याला दरवाजाकडे नेले. त्यानें माझ्याकडे आश्चर्यानें व कृतज्ञतेनें पाहिलें. ह्यावेळीं आम्हांस मूर्तिमंत स्नेहाची खरीखुरी कल्पना आली. तिच्या बिछान्याजवळ आम्ही दोघें गेलों. ती त्यावर पडलेली होती. तिचें डोके व खांदे सोडून बाकीचा भाग पांढऱ्या कापडानें झांकला होता. मी तेथें अगदीं जवळ असलेला त्याला आवडणार नाहीं म्हणून थोडासा दूर गेलों. माझ्याप्रमाणें तोही तिला पाहतांच मटकन् खालीं बसला व एकदम रडूं लागला.

अशावेळीं मी तरी काय म्हणणार ? अर्थातच मी कांहींएक म्हणालों नाहीं. थोड्या वेळानें मी त्याला उठविलें व जवळच्या सोफ्याकडे नेलें. तेथें आम्ही दोघे एकमेकाशेजारीं बसलों व त्याचें सांत्वन करण्यासाठीं म्हणून मी त्याच्या सुंदर केंसावरून हात फिरविला. त्यानें माझा हात आपल्या हातांत घेतला व प्रेमानें तो थोडासा दाबला. नंतर तो म्हणाला, " डाक्टर साहेब, जें सर्व खरें घडलें असेल तें मला सांगा. तिनें स्वतः आत्महत्या केली नाहीं ना ? "

" नाहीं. " मी उत्तर दिलें.

" मग तिच्या ह्या मृत्यूबद्दल दुसऱ्या कोणास दोष देतां येईल काय ? " त्यानें विचारिलें.

" नाहीं. " मी पुन्हां उत्तर दिलें. माझ्या अंतःकरणांत मी...तू...आपण दोघे...आणि तिचा शोचनीय मानीपणा, हीं सर्व तिच्या मृत्यूस कारणीभूत आहेत, हें उत्तर सारखें घुमत होतें परंतु आत्मसंयमन करून हे शब्द मी तसेच आंतल्या-आंत दाबले व पुन्हां म्हणालों, " नाहीं, तसा कोणालाच दोष देतां येत नाहीं...दैवयोगच असा."

तो दुःखानें म्हणाला, " पण मला त्याची कल्पनाच येत नाहीं. हें अगदींच अविश्वसनीय वाटतें. नृत्यसमारंभाकरितां जेव्हां ती आली होती तेव्हां ती माझ्याकडे पाहून मान डोलावून हंसलीसुद्धां ! मग अशा अनपेक्षितरीतीनें एकाएकीं ती मेली तरी कशी ?"

मी त्याला शेंकडों खोट्या गोष्टी सांगितल्या. तिच्या प्रियकरापासूनसुद्धां मला ही गोष्ट गुप्तच ठेवली पाहिजे. आम्ही तो दिवस व त्यानंतरचे दोनचार दिवस एकमेकांशीं भावंडां-सारखे बोलण्यांत घालविले. त्या मृतस्त्रीविषयीं जरी आम्ही एकमेकाजवळ कांहीं बोललों नाहीं तरीसुद्धां तिच्याशीं आलेल्या आमच्या संबंधामुळेंच आमच्या उभयतांच्या आयुष्यांतील

कांहीं दिवस एकत्र गेले ह्याची परस्परास पूर्ण जाणीव होती. ती गोष्ट गुप्त ठेवण्याकरितां मला बराच त्रास पडला हें खरें, परंतु शेवटपर्यंत मी त्यांस ती गोष्ट कळू दिली नाहीं. त्याच्यामुळेंच ती गरोदर राहिली, उभयतांच्या प्रेमाचें फळ म्हणजेच तो गर्भ, तोच नाहीसा करण्याकरितां ती माझ्याकडे आली, मी तसें करण्याचें प्रथम नाकारल्यामुळें तिनें तो गर्भ नाहींसा करण्याकरितां ज्या गोष्टी केल्या त्यामुळेंच तिचें मरण ओढवलें; वगैरेपैकीं मी त्यास कांहींच कळू दिलें नाहीं. माझ्याविषयीं तपास चालू होता म्हणून मी तिच्या प्रियकराच्या घरीं दडून राहिलों होतों. प्रेताची पेटी बंद केल्यावर ठरल्याप्रमाणें तिचा नवरा आला. निरनिराळया बातम्या कानावर पडल्यामुळें त्याचें मन भलतेंच संशयी बनलें होतें व खरी वस्तुस्थिती काय आहे हें माझ्याकडून जाणण्याची तीव्र इच्छा होती. परंतु ज्या तिच्या नवऱ्यासंबंधीच्या भितीनें तिला एवढा त्रास सोसावा लागला, त्याला भेटावें असेंसुद्धां माझ्या मनांत येईना व म्हणून मी लपून राहिलों होतों. खोट्या नांवाचा पासपोर्ट तिच्या प्रियकरानें माझ्याकरितां मिळविला व रात्रीं बऱ्याच उशिरा निघणाऱ्या एका आगबोटींत मी पाय ठेवला. माझी सर्व चीजवस्त, मी केलेलें सात वर्षांतील सर्व कार्य तेथेंच टाकून मी निघालों. ज्याला वाटेल त्यानें माझ्या घरांत वास्तव्य करावें अशा थाटानें तें तसेंच तेथें उघडें होतें. रजा मंजूर झाल्याशिवाय मी

गैरहजर राहिलों म्हणून अधिकाऱ्यांनीं सरकारी ऑफिसरांच्या यादींतून माझें नांव काढून टाकलें. ज्या घरांत, ज्या गांवांत, ज्या प्रांतांत हें सर्व घडलें व जेथें मला पदोपदीं त्या इंग्रज स्त्रीची आठवण झाली असती त्या ठिकाणीं राहणें मला शक्य नव्हतें. मी त्या रात्रीं तसा चोरासारखा पळालों, कारण तिच्याविषयीं सर्व कांहीं विसरून जावें हाच माझा उद्देश होता. परंतु त्या स्त्रीला विसरण्याचा तोही प्रयत्न विफल ठरला. त्या मध्यरात्रीच्या सुमारास मी जेव्हां बोटीवर चढलों, तेव्हां माझा तो मित्र··· तिचा प्रियकर······मला निरोप देण्यासाठीं तेथें आला होता. त्याचवेळीं एक मोठी लांब पेटी क्रेननें बोटीवर चढविली जात होती. होय, तिचें प्रेत असलेलीच ती पेटी होती. ज्याप्रमाणें ती जिवंत असतानां मी तिचा पाठलाग केला होता त्याच-प्रमाणें तिचें प्रेत असलेली ती पेटी आता माझा पाठलाग करीत होती. त्यावेळीं मला मुद्दामच दुसरीकडे पाहणें भाग पडलें कारण तिचा नवरादेखील तेथें होता. तो युरोपला परत चालला होता. कदाचित् तो तेथें पोहोंचल्यावर ती पेटी उघडून प्रेताची डॉक्टरकडून तपासणी करवील. कांहीं जरी असलें तरी तिचें प्रेत तो बरोबर नेत होता. सिंगापूरला मी एका जर्मन मेल बोटींत ( ओशिआनिया ) बसलों. ती पेटीही त्याच मेल बोटींत चढविण्यांत आली व तिचा नवराही येथें याच बोटीवर आहे. मी त्या पेटीवर सारखें लक्ष ठेविलें आहे.

ज्या मनुष्यापासून आपणांस त्रास होवू नये म्हणून तिनें मृत्यूसुद्धां पत्करला त्या तिच्या नवऱ्यापासून मी तिचें शेवट-पर्यंत संरक्षणच करीन व यांतलें मी त्यास कधींही कांहीं कळू देणार नाहीं. या जगांत तिच्या संबंधींची ती गुप्त गोष्ट मला एकट्यालाच माहीत आहे. मी इतर उतारूंपासून स्वतः दूरदूर कां रहात असतों याचें कारण तुम्हांस आतां समजलेना ? उतारूंनीं हंसताना व गप्पागोष्टी मारताना किंवा एकमेकांशीं चेष्टा करताना पाहिलें कीं, तें मला सहन होत नाहीं. कारण याच बोटीवर इतर पेट्या व लगेज् यामध्यें तिचें प्रेत असलेली पेटी आहे हें मला माहीत आहे. मला तर त्या पेटीजवळ जातां येत नाहीं परंतु ज्यावेळीं प्रवासी लोक प्रौमेनेड डेकवर इकडून तिकडे हिंडतात किंवा दिवाणखान्यांत नृत्य करतात, तेव्हां मला मी तिच्या सान्निध्यांत आहे असें वाटतें. असें वाटणें मूर्खपणाचें आहे हें मी जाणतों. समुद्राच्या पोटांत लाखों प्रेतें असून तीं तेथें प्रत्यही कुजत आहेत हेंहि मला माहीत आहे. तरीपण ज्या बोटीवर तिचें प्रेत आहे त्या बोटीवरील प्रवाश्यांनीं अशारीतीनें हंसावें, नृत्य करावें, आनंदीआनंद करावा हें मला असह्य होत आहे. ती मृत स्त्री मजपासून आणखी कशाची अपेक्षा करीत आहे हें मला माहीत आहे. तिचें रहस्य अजून कायमचेच सुरक्षित असें झालेलें नाहीं. त्याला तशी कायमची सुरक्षितता आल्याशिवाय मी माझें वचन पाळलें असें होणार नाहीं.

× × × × ×

जहाजाच्या मध्यभागाकडून पावलांचा आवाज आला. लाशी लोक डेक स्वच्छ करीत होते. तो आत्म- वेदक गृहस्थ एकदम उठला व म्हणाला " मला आतां गेलें हिजे. " त्याच्या त्या काळजीनें काळवंडलेल्या चेहऱ्याकडे हून मला फार वाईट वाटलें. रडण्यानें व दारूमुळें ाचे डोळे लाल झाले होते. आपण भरमसाटपणें सर्व किकत सांगितली याजबद्दल त्याची त्याला लाज वाटत असून श्चात्ताप होत आहेसें दिसलें.

मित्रत्वाच्या भावनेनें मी म्हणालों, " आज दुपारीं तुमच्या बीनमध्यें येऊन तुम्हाला भेट देण्यास तुम्ही मला परवानगी णार नाहीं काय ? " त्याच्या चेहऱ्यावर एक प्रकारचें विकट स्य चमकूं लागलें. थोड्या वेळानें तो मृदु शब्दांत म्हणाला, होय, दुसऱ्यास मदत करणें हें प्रत्येकाचें कर्तव्य आहे ही मची आवडती म्हण आहे. होय ना ? कांहीं तासांपूर्वी तुम्ही व्हां प्रथमतः ही म्हण म्हणालात त्यावेळीं माझ्या दुःखाच्या नावर तिचा इतका परिणाम झाला कीं, जिभेच्या टोकावर जें येईल तें तें मी तुम्हासमोर बोलत सुटलों. तुमच्या सदिच्छे द्दल मी तुमचा आभारी आहे. परंतु मी एकटाच असलेलें ला बरें वाटतें. मी माझ्या मनांतील प्रत्येक गोष्ट तुम्हांस ांगितली त्यामुळें मला विशेषसें बरें वाटतें, असें तुम्ही समजूं

नका. माझ्या आयुष्याचे इतके तुकडेतुकडे झाले आहेत कीं, ते एके ठिकाणीं सांधणें आतां शक्य नाहीं. डच वसाहतींत ७ वर्षें नोकरी करून शेवटीं मला कांहींच मिळालें नाहीं. मला पेन्शनही मिळालें नाहीं व एखाद्या भणंग भिकाऱ्याप्रमाणें मी जर्मनीला परत चाललों आहे. ज्याप्रमाणें एखादें कुत्रें मेलेल्या पशूच्या मागें जातें, तद्वतच माझी स्थिती झाली आहे. वेडापिसा मनुष्य सदासर्वकाळ बेफाम धावूं शकत नाहीं. त्याचें बक्षीस शेवटीं त्याला मिळतेंच. त्याला ज्याप्रमाणें गोळी घालून ठार करतात, तसाच आतां माझाही शेवट जवळ आला आहे, असें मला वाटूं लागलें आहे. माझ्या केबीन्‌मध्यें मला एकलकोंडें न वाटण्यास पुष्कळशा गोष्टी आहेत. तेथें उत्तम व्हिस्कीच्या बऱ्याच बाटल्या आहेत आणि त्या म्हणजे माझें एक मोठें समाधान होय. तदनंतर माझा दुसरा एक जुना मित्र केबीन्‌मध्यें आहे. तो म्हणजें माझा आटोमॅटिक पिस्तुल होय. उघडपणें सर्व गोष्टी कबूल करून किंवा एकाद्याजवळ मनमोकळेपणानें सांगून जेवढें सान्त्वन होणार नाहीं, तेवढें हा एकच मित्र आतम्याला देवूं शकेल. म्हणून आपली जरी कांहीं ना नसली तरी आपणांस मला भेटावयास येण्याविषयीं तसदी देऊं नये असेंच वाटतें. मनुष्याला या जगांत जे कांहीं नैसर्गिक हक्क प्राप्त झाले आहेत त्यापैकीं एक मोठा हक्क··· ···जो कोणाला कधींही त्याच्यापासून घेतां येणार नाहीं···तो

म्हटला म्हणजे आत्महत्त्येचा ! कोणाचीही मदत न घेतां जेव्हां वाटेल तेव्हां वाटेल तेथें स्वतःच्या ठिकऱ्याठिकऱ्या उडवून टाकतां येणें, हाच तो हक्क होय ”.

त्यानें पुन्हां माझ्याकडे तिरस्कारानें व आव्हान्‌पूर्वक-दृष्टीनें पाहिले. परंतु त्याला लज्जा वाटत होती हें स्पष्ट दिसत होतें. निरोपादाखल कांहीं न बोलतां त्यानें तोंड फिरविलें व केबीन्सच्या बाजूनें तो संथ व खिन्नपणें चालता झाला. मी त्यानंतर डेकवरच्या पुढल्या भागाकडे मध्यरात्रीच्या सुमारास बरेंच वेळा गेलों. तरी तो इसम मला पुन्हां कधींही भेटला नाहीं. तो गृहस्थ सर्वथा अदृश्य झाल्यासारखाच झाला होता व मला पुनः पुनः वाटे कीं, हा जो सर्व वृत्तान्त मी ऐकला तो निव्वळ भास होय. परंतु एक डच मनुष्य ( दंडावर सुतकाचें चिन्ह म्हणून काळ्या कपड्याचा पट्टा अडकविलेला ) उतारूंच्या मधून इकडेतिकडे डेकवर हिंडतांना मला दिसत असे व ह्या मनुष्याची बायको उष्णकटिबंधांत प्रचलित असलेल्या तापानें मेली असेंही इतर लोक सांगत. तो कोणाशींही न बोलतां एकटाच डेकवर येरझारा घालीत असे व त्याचा चेहरा अत्यंत दुःखी होता. त्याच्याकडे जेव्हां मी पाहिलें तेव्हां त्याच्या दुःखाचें गुप्त कारण मला माहित आहे या भावनेनें मलाही दुःख होई. जेव्हां जेव्हां तो माझ्यासमोरून

जात असे, तेव्हां तेव्हां मी झोऊन माझे तोंड फिरवीत असें; न जाणो माझ्या मुखचर्येवरून आपल्या नशिबाविषयीं आपल्यापेक्षां यालाच जास्त माहिती आहे असा तो कयास बांधावयाचा !

× × × × × ×

नेपल्स बंदरांत जो अपघात झाला तो त्या अज्ञात मनुष्यानें सांगितलेल्या हकिगतीवरून आतां स्पष्टच आहे. त्यावेळीं मी पूर्वी सांगितल्याप्रमाणें बरेचसे उतारू किनाऱ्यावर उतरले होते. मी ऑपेरा पहावयास गेलों होतों व नंतर एका हॉटेलांत चमचमीत जेवणही झोडलें. मी लहान होडींत बसून मोठ्या आगबोटीकडे जात असतानां लोकांच्यांत एकच गडबड व गोंधळ उडून गेला आहे हें माझ्या नजरेस पडलें. कंदील, मशाली वगैरे घेऊन लोक पाण्यांत कांहीं तरी शोधत होते. मी डेकवर आल्यावर एका खलाशास काय झालें म्हणून विचारलें. तो उत्तर देण्याची टाळाटाळीच करीत होता. तेव्हां त्यावरून त्याला ह्या गोष्टीविषयीं न सांगण्याबद्दलची ताकीद दिली गेली असावी असें वाटतें. दुसऱ्या दिवशीं जेव्हां आम्ही जेनोआकडे चाललों होतों, तेव्हांसुद्धां यासंबंधांत कांहीं माहिती मिळेल असें मला वाटत नव्हतें. परंतु त्या रात्रीं नेपल्सला जें घडलें त्याच्या अतिशयोक्तिनें भरलेली

हकिगत मला एका इटालियन वर्तमानपत्रांत वाचावयास मिळाली.

" रात्रीं अंधार असतांना डच ईंडीजमधून आलेली एक प्रेताची पेटी लहान बोटींत ठेवण्याकरितां खालीं उतरविण्यांत येत होती. त्या पेटींत एका स्त्रीचें प्रेत असून तिचा नवरा खालीं बोटींत वाट पहात होता. तो तें प्रेत पुरण्यासाठीं यूरोपला घेऊन चालला होता. ती पेटी अर्धवट खाली होत असतां त्या पेटीवर एकदम धाडकन् कांहीं तरी जड असा पदार्थ आदळला व त्यामुळें त्या पेटीला बांधलेल्या दोऱ्या ताडकन् तुटल्या व ती खालीं असलेल्या बोटीवर आदळली व पाण्यांत पडली. त्या पेटीला भोंवती शिसाचा पत्रा मारला असल्यामुळें ती तावड-तोब पाण्यांत बुडाली. मनुष्यहानी नाशिबानें कांहींच झाली नाहीं, कारण ती पेटी पडली ती कोणाच्याही अंगावर पडली नाहीं व कांहीं प्रयासानें कां होईना पण त्या स्त्रीचा नवरा व इतर खालच्या बोटींत ( होडींत ) बसलेले लोकांना वांचवितां आले. या अपघातास कारण काय घडलें ? रिपोर्टरनें असें म्हटलें होतें कीं, त्याच सुमारास कोणी एका वेड्या मनुष्यानें बोटीवरून समुद्रांत उडी मारली व ती त्या पेटीवर पडली. त्यामुळें तिला बांधलेल्या कच्च्या दोऱ्या तुटल्या व पेटी खालीं पडली. जे लोक ती पेटी खालीं सोडीत होते त्यांच्या डोषावर पांघरूण घालण्याकरितां एका वेड्यानें त्या पेटीवर

उडी मारली, ही कल्पित गोष्टही रचिली गेली असेल. कारण खलाशानें पेटीकरितां उपयोगांत आणलेले दोर कच्चे होते व ती पेटी, भोंवती शिसाचा पत्रा मारलेली असल्यामुळें, जड होती व म्हणून ते दोर तुटले. कांहीं असले तरी असल्या प्रकारच्या निष्काळजीपणाचा दोष बोटीवरच्या अधिकाऱ्यांच्या माथीं येतोच ”.

वर्तमानपत्राच्या दुसऱ्या भागांत असा मजकूर होता कीं, नेपल्स बंदरांत एका सुमारें ३५-४० वर्षें वयाच्या अज्ञात गृहस्थाचें प्रेत सांपडलें आहे. कॉफिन् खालीं करीत असतांना घडलेल्या अपघाताशीं मात्र कोणीही त्याचा संबंध जोडला नाहीं.

मी जेव्हां ते दोन पॅरिग्राफ्स् वाचले, तेव्हां माझ्या डोळ्यासमोर मला वर्तमानपत्राच्या छापील कागदावर, ज्या गृहस्थानें सांगितलेली गोष्ट मी येथें देत आहे, त्याचा भयानक, दुःखीकष्टी चेहरा दिसूं लागला.

---